वैद्य. चिन्मय फडके
फेब्रु २०१७

"आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः"

# कुटीप्रावेशिकरसायन - कल्पविधि.

(कायाकल्प)

## -बोधपत्र-

प्रारंभ दिन-१ फेब्रुवारी १९६६

परिसमाप्तिदिन-१४ एप्रिल १९६६



स्थानः-गणेशपुरी-वज्रेश्वरीजवळ.
महंत श्री मुक्तानंदमहाराज
आश्रम परिसरः



प्रधान संचालकः-आयुर्वेदाचार्य वेणीमाधव शास्त्री जोशी अध्यक्ष.
आयुर्वेद भवन-४४४ मनमालाटँक, माटुंगा-मुंबई १९



टेलिफोन नं. ४५१६३९ आणि ४५२१६८

आयुर्वेदभवन

# आयुर्वेद चिकित्सालय व सूतिकागृह

स्थापना ( धनत्रयोदशी ) शके १८८३

दि. ५ नोव्हेंबर १९६१

४४४ मनमाळा टँक रोड, बॉम्बेग्लास वर्क्स, जवळ, मुंबई १६

## संचालक मंडळ

वैद्य वेणी माधवशास्त्री जोशी.
आयुर्वेदाचार्य,

वैद्य नारायण हरि जोशी.
आयुर्वेदविशारद,

वैद्य लक्ष्मीबाई बोरवणकर.
आयुर्वेदविशारद,

वैद्य सौ. कमलाबाई करंदीकर.
आयुर्वेदभिषग्,

वैद्य सौ. कुसुम धोंडो अंतरकर.
आयुर्वेदप्रवीण,

सन्मान्य सहायक :

वैद्य श्री. धोंडो सदाशिव अंतरकर.
आयुर्वेदचार्य, D. A. S. F.

नमोऽस्तु अश्विभ्याम्

# अनुभूत रसायनचिकित्सा इतिवृत्त

**चिकित्सितं व्याधिहरं, पथ्यं साधनमौषधम् ।**
**प्रायश्चित्तं प्रशमनं, प्रकृतिस्थापनं हितम् ॥**
**विद्यात् भेषजनामानि** ॥ च. सं. च. १।३ ॥

आपण नित्य निरोगी रहावें आणि दीर्घायुष्य मिळवावें अशी मानवाची प्रबल इच्छा असते. तथापि 'पुण्यस्य फलमिच्छंति पुण्यं नेच्छंति मानवाः । फलं पापस्य नेच्छंति पापं कुर्वंति यत्नतः' अशीच बहुधा सर्वत्र स्थिति आढळते. जगाच्या कल्याणार्थ अहर्निश तळमळणाऱ्या ऋषिमुनींनीं हें जाणून 'साडे ओझे त्यास तेंचि द्यावें' ह्या न्यायानें मानवाचे हे उद्देश सफल करण्यासाठीं बुद्धिसामर्थ्य आणि तपःसामर्थ्याच्या बळावर अनेकविध उपायांचें संशोधन करून ते जगापुढें आयुर्वेद शास्त्राच्या रूपानें मांडले. झालेले रोग बरे करण्यापेक्षांही रोग होऊंच नयेत यासाठीं त्यांनीं उपाय सुचविले आहेत. व नंतरच कारणवशात् झालेल्या रोगांचा परिहार करण्याच्या दृष्टीनें उपाय निवेदन केले आहेत. आणखीही एक गोष्ट त्यांनीं हेरली ती ही कीं हें कांहींही केलें तरी क्षणाक्षणाला शीर्यमाण होणारें म्हणजे झिजणारें म्हणून ज्याला शरीर म्हटलें जातें तें अवस्थापरत्वें झिजत झिजतच कालवश होत असतें; तेव्हां अशा ह्या शरीराची झीज थांबवतां आली तर निरामय दीर्घायुष्य प्राप्ति होऊन 'यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः' म्हणजेच ह्या आयुष्याचा सदुपयोग करीत करीत इहलोकींच्या ऐश्वर्याचा उपभोग घेऊन शेवटीं निःश्रेयस म्हणजेच परंधाम मोक्षाची साधना ही आपणास करतां येणार आहे. व तोच खरा मनुष्यधर्म आहे.

## वयोऽवस्था.

बालपणापासूनच शरीराच्या घटकांची वृद्धि होण्यास प्रारंभ होतो. कांहींही आघात अपघात, आधि-व्याधींचा उपद्रव न झाला तर वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत ती वाढ अव्याहत चालू राहून पुढील वीस वर्षांपर्यंत म्हणजे चाळिशीच्या वयाच्या कक्षेंत सर्व धातु घटक, सर्व इंद्रियें, बल आणि वीर्य ह्यांची शरीरांत सर्वसंपूर्णता निर्माण झालेली असते. या पूर्वीच्या दहा वर्षांचा काळ म्हणजेच वयाच्या वीस ते तीस वर्षांचा काळ हा संपूर्ण यौवनावस्थेचा कालखंड गणला गेला आहे. चाळिशी उलटली कीं आयुष्याची उतरती भांजणी सुरू होते. म्हणजेच पूर्णावस्थेला पोंचलेले शारीर घटक न कळत क्षीण होऊं लागतात; व सत्तराव्या वर्षापर्यंत तें चालू असतें; या पुढें मात्र त्या क्षीण घटकाचे दृश्य परिणाम शरीराच्या त्वचेवर वळ्या पडणें, केस पांढरे होणें, टक्कल पडणें, खोकला, दमा इ० उपद्रवांचा हल्ला होत राहाणें, व त्यामुळेंच जुनाट असें डागडुजी न झालेलें घर ऊन्ह, वारा, पाऊस यांच्या आघातांनीं आणि मनुष्यवस्ती नसल्यानें साप, उंदीर, घुशी, वाळवांनीं पोकळ करून ठेवल्यामुळें झरत झरत एके दिवशीं अकस्मात् भूमिशरणागत व्हावें, अथवा केव्हां घडेल हा संभवही निश्चित असूं नये तशी ह्या देहाचीही स्थिति होऊन तो पंचत्वाला पोंचतो. शरीराच्या ह्या अवस्थांचें वर्णन सुश्रुताचार्यांनीं केलें तें असें-

" तत्र आविंशतेः वृद्धिः आत्रिंशतः यौवनं, आचत्वारिंशतः
सर्वधात्विंद्रियबलवीर्यसंपूर्णता; अतऊर्ध्वं ईषत् परिहाणिः
यावत् सप्ततिः इति । सप्ततेः ऊर्ध्वं क्षीयमाणधात्विंद्रियबल-
वीर्योत्साहं अहनि अहनि वलीपलितखालित्यजुष्टं कासश्वास-
प्रभृतिभिरुपद्रवैः अभिभूयमानं सर्वक्रियासु असमर्थं जीर्णा-
गारमिव अभिवृष्टं अवसीदंतं वृद्धमाचक्षते ॥

॥ सु. सू. ३५। २९ ॥

सत्तरी उलटल्यावर होणाऱ्या देहमनःस्थितीलाच वृद्धत्व म्हटलें आहे. तेव्हां याचा अर्थ असाही होऊं शकतो कीं विकृत आहार-आचारांच्या आधिक्यानें कित्येक

व्यक्तींना ह्या वयापूर्वींच अशी चिन्हें सुरूं झाली तर त्यांना अकालीं वृद्धत्व आलें असेंच म्हणावें लागेल.

अशा प्रकारें शरीराला आलेली जरा घालवणें आणि असतील त्या व्याधींचा नाश करणें ह्या क्रियेला शास्त्रीय परिभाषेंत रसायन असें म्हटलें आहे.

आरंभींच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें औषधोपचारांना चिकित्सा, व्याधिनाशन, पथ्य, साधन, औषध, प्रायश्चित्त, प्रशमन, आणि प्रकृतिस्थापन अशा संज्ञा आहेत, त्या सहेतुक आहेत. प्रकृतिस्थापन चिकित्सा ही व्याधीच्या अवस्थेंतील दोषशामक म्हणून केली जाते पण त्यानंतर जन्मस्थ दोषांचेंही शमन करण्यासाठीं ती करावयाची असते. तर रसायन-चिकित्सा व्याधिनाशन म्हणून करण्यास उपयुक्त ठरतेच पण जरा नाशन म्हणजे शारीर घटकाची झीज भरून काढून वयोऽवस्थेवर सुद्धां इष्ट परिणाम करीत असते. सध्यां सर्वतोमुखी चर्चेचा व कुतूहलाचा झालेला विषय तोच हा रसायनविधि होय. ह्या विधीची सर्वसामान्य कल्पना जनसाधारणासही देण्याचा प्रयत्न ह्या छोट्याशा पुस्तिकेंतून करावयाचा आहे.

## कल्पनेचा उगम.

श्री. दत्तात्रेय रामचंद्र वेलणकर नांवाची एक सामान्य व्यक्ति ह्या रसायन विधीच्या कल्पनेला मूर्तस्वरूप देण्यास कारणीभूत आहे हें प्रथमच गौरवपूर्वक नमूद करावयास पाहिजे. 'रसायन कल्पानें वृद्धाला तारुण्य प्राप्त होतें' हें वर्णन आयुर्वेदीय ग्रंथांतून केलेलें आहे. ह्या प्रयोगानें च्यवनऋषींनीं तारुण्य मिळविलें तसेंच 'ऋषयः अमितं आयुः लेभिरे' म्हणजे अनेक ऋषींनीं आपल्या यज्ञयागादि व तपः सिद्धीसाठीं दीर्घायुष्यही मिळविलें असेंही ग्रंथांत निवेदन आहे. सुमारें तीस वर्षांपूर्वीं महामना पंडित मदन मोहनमालवीयजींनीं ह्या रसायन प्रयोगाचा अनुभव घेतल्याचें त्यावेळच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालें होतें पण त्या प्रयोगांतील यशस्विता शास्त्रीय कसोटीवर पारखली गेली नाहीं. तो विधि आणि त्याचें पथ्यपालनही यथाशास्त्र झालें नाहीं इ० वृत्तही त्यानंतर स्वतः पंडितजींनीं स्वतःच्याच एका प्रकट निवेदनांतून प्रसिद्ध केल्यामुळें शास्त्रीयदृष्ट्या जिज्ञासा अपूर्णच राहिली. ती पूर्ण होण्याचा सुयोग श्री. वेलणकर ह्या व्यक्तीमुळें आला.

## श्री० वेलणकरांची कल्पना.

श्री. वेलणकर हे अध्यात्म प्रवृत्तीचे एक गृहस्थ नव्हे ब्रह्मचारी आहेत. जप-जाप्य, अनुष्ठान, पुरश्चरणादि साधनांच्या द्वारें ईश-चिंतनांत त्यांनीं आयुष्याचीं ऐन उमेदीचीं बरींच वर्षे व्यतीत केली. आणि ह्याच कामासाठीं आपणास अधिक शारीरबल, मनोबल व दीर्घायुष्य प्राप्त व्हावें ही जिज्ञासा त्यांना निर्माण होऊन कर्णोपकर्णी माहीत झालेला कायाकल्प आपण करून घ्यावा असें त्यांना वाटलें. मग त्याच शोधांत कांहीं वर्षे त्यांनीं घालविलीं.

हा विधि करण्यासाठीं आवळ्याच्या झाडावर बसून पोटभर आवळे खावे लागतात असें त्यांना समजलें व केवळ दुग्धाहार करावयाचा असतो एवढीच माहिती त्यांना कळली होती. तेव्हां आपण तसें करून कायाकल्प करून घेण्याचें त्यांनीं मनाशीं निश्चित केलें. आणि त्या हेतूनें वैद्यांचा विचार घ्यावा म्हणून ठिकठिकाणीं हिंडले, त्या हिंडण्यांतच आवळ्याच्या झाडांचा ही शोध चालू ठेवला. अशा संधींतच त्यांचेच एक वृद्ध वैद्यमित्र मुंबईचे श्री मावळणकर शास्त्री यांच्याकडे ते पोंचले व आपला हेतु त्यांनीं त्यांना निवेदन केला. वैद्य श्री मावळणकरशास्त्री हेही अध्यात्मप्रवृत्तीचे एक वैद्य आहेत. त्यांना श्री. वेलणकरांचा विचार आवडला. तथापि हा प्रयोग शास्त्रोक्त पद्धतीनें झाला तरच कांहीं श्रेय प्राप्त होणार आहे ही कल्पना त्यांनी श्री वेलणकरांना पटवून दिली व त्यासाठीं मुंबईतच आयुर्वेदशास्त्राचा संशोधनात्मक दृष्टींतून सखोल अभ्यास केलेले वृद्धवैद्य आयुर्वेदाचार्य श्री वेणी-माधवशास्त्री जोशी यांची गांठ घेण्यास सुचविलें.

## आयुर्वेदभवन संस्था.

आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री हे मुंबईतच माटुंगा येथें केवळ आयुर्वेदीय उपचारांनींच अनेक जटिल रोगांची चिकित्सा करून यश संपादन करण्यांत सर्वतोमुखी झालेल्या आयुर्वेदभवन ह्या संस्थेचे अध्यक्ष असल्यानें त्यांनीं श्री वेलणकरांच्या भेटी-नंतर शास्त्रानें प्रतिपादित परंतु प्रत्यक्षांत अनुभव कुणीही कोठेंही यथाशास्त्र घेतल्याचें ऐकिवांत वा पाहाण्यांत नसल्यानें जर श्री वेलणकरांच्या इच्छेऽनुसार शास्त्रीय दृष्ट्या ह्या 'कायाकल्प' प्रयोगाचा अनुभव घेतां आला व प्रयोग यशस्वी झाला तर आयुर्वेदाचें एक फार मोठें दालन खुलें केल्याचें श्रेय संपादनाचे समाधान आयुर्वेद भवन संस्थेला लाभेल; आणि या पूर्वी न घडलेला व पुढेंही घडण्याची शक्यता क्वचित् असलेला हा एक अभूतपूर्व प्रयोग याच देहीं याच डोळ्यांनीं केल्याचें फार मोठें समाधान लाभेल असा विचार करून ह्या बाबतींत विशेष लक्ष घालण्याचें मनाशीं योजून संस्थेच्या सर्व सहकाऱ्यापुढें हा प्रश्न मांडावयाचें ठरविलें; पण त्यापूर्वी अशा प्रयोगाला पात्र श्री वेलणकर ही व्यक्ति

आहे कीं नाहीं दृढनिश्चय कितपत आहे इ. परीक्षण करण्यासाठीं बऱ्याचशा अडचणींचा डोंगर श्री वेलणकरांपुढें उभा करून टाळण्याचा प्रयत्न केला. पण त्या कसोटीस श्री वेलणकर उतरत आहेत अशी खात्री पटल्यावरच वै. ना. ह. जोशी, वै० अंतरकर, वै. लक्ष्मीबाई वोरवणकर आणि वै. सौ. कमलाबाई करंदीकर यांचेसह विचारविनिमय केला.

## योग्य व्यक्ति.

प्राप्त संधीचा लाभ अवश्य करून घ्यावा असें सर्वानुमतें निश्चित झालें. तरी सुद्धां ज्या व्यक्तीवर हा प्रयोग आपण करणार म्हणतों ती व्यक्ति ह्या विधीसाठीं शास्त्रानें सांगितलेल्या पात्रतेच्या दृष्टीनें किती गुणांनीं समर्थ आहे हेंही बारकाईनें पाहिलें पाहिजे. कारण त्या गुणपात्रतेवरच प्रयोगाची सफलता अवलंबून असते. त्या दृष्टीनें मग श्री० वेलणकरांचें गुणपरीक्षण केलें गेलें. चरकाचार्यांनीं रसायनकल्प विषीस पात्र व्यक्तीचें केलेलें वर्णन–

“ सत्यवादिनमक्रोधं निवृत्तं मद्यमैथुनात्।
अहिंसकमनायासं प्रशान्तं प्रियवादिनम्॥
जपशौचपरं धीरं दाननित्यं तपस्विनम्।
देवगोब्राह्मणाचार्यगुरुवृद्धार्चने रतम्॥
आनृशंस्यपरं नित्यं नित्यं करुणवेदिनम्।
समजागरणस्वप्नं नित्यं क्षीरघृताशिनम्॥
देशकालप्रमाणज्ञं युक्तिज्ञमनहंकृतम्।
शस्ताचारमसंकीर्णं अध्यात्मप्रवणेंद्रियम्॥
उपासितारं वृद्धानां आस्तिकानां जितात्मनाम्।
धर्मशास्त्रपरं विद्यात् नरं नित्यरसायनम्॥
गुणैरेतैः समुदितैः प्रयुंक्ते यो रसायनम्।
रसायनगुणान् सर्वान् यथोक्तान् स समश्नुते॥

॥ च. सं, चि. ४ पाद ४॥

अर्थ–सत्यवक्ता, न रागावणारा, मद्य आणि मैथुनापासून संपूर्ण तया अलिप्त, मनानेंही कुणाची हिंसा न चिंतणारा, विशेष परिश्रम न करणारा, शांतवृत्ति, कुणालाही आवडेल असें बोलणारा, नित्य पवित्र आचरण ठेवून जपजाप्य करणारा, धैर्यशील, यथाशक्ति दान करावें हा स्वभाव असणारा, तपस्वी, देव, गाय, ब्राह्मण, आचार्य, गुरु, वडील माणसें ह्यांचें पूजन व सेवा करण्यांत आनंद मानणारा, किडामुंगीचीही हत्या होऊं नये यासाठीं अति जपणारा, दुःखीजनांच्या दुःखानें स्वतः दुःखी होऊन त्यासाठीं जाणीवपूर्वक करतां येईल तें करणारा, वेळेवर झोपून प्रसन्नतेनें जागृत होणारा, नित्य दूध, तूप सेवन करणारा, देश, काल, प्रमाण, युक्तीची जाणीव असणारा, निरहंकारी मनमोकळी निष्कपट वागणूक असणारा असा कुलीन अध्यात्म म्हणजे मोक्षसाधनेची इंद्रियांना ओढ असलेला वृद्ध, आस्तिक मताचे लोक व नित्य मनावर ताबा ठेवून संयमानें वागणारांची आदरपूर्वक सेवा करणारा, आणि धर्मशास्त्राचें वाचन व त्याच्या आज्ञांचें निष्ठेनें पालन करणें हा ज्याचा नित्य व्यवसायच बनला आहे. अशा वृत्तीचे लोक हे नित्यरसायनसेवीच समजण्यास अडचण नाहीं, व असेच लोक जर ह्या रसायनकल्पाचें सेवन करतील तर ते त्यांची संपूर्ण फळें मिळवूं शकतील. सर्व साधारणतः कोणताही रसायनविधि करायचा झाला तरी ह्या पात्रतेची आवश्यकता असते. परंतु ह्या रसायन विधींतला 'कुटीप्रावेशिकविधि' नांवाचा जो प्रकार प्रयोग म्हणून श्री वेलणकरांवर करावयाचा आहे. त्यासाठीं तर याहूनही आणखी कांहीं गुणांची आवश्यकता असल्याचें शास्त्रकारांनीं म्हटलें असल्यानें तोही विचार व ती परीक्षा करावी लागली ते गुण असेः—

“ समर्थानां अरोगाणां धीमतां नियतात्मनाम्।
कुटीप्रवेशः क्षमिणां परिच्छदवतां हितः॥

॥ च. चि. ४।४।२७॥

म्हणजे जे शरीर आणि मनानें बलवान आहेत. कोणताही रोग नाहीं, चांगले धनसंपन्न आहेत. आपल्या मनावर आणि इंद्रियांवर ताबा ठेवूं शकतात. सर्व क्रिया, कष्ट व परिश्रम करण्याची क्षमता ज्यांच्या ठिकाणीं आहे. आणि हा विधि चालू असतां आवश्यक ती शुश्रूषा करणारा परिवार ज्यांच्याजवळ आहे अशांनाच हा विधि श्रेयस्कर होतो. तात्पर्य हें कीं तन-मन-धनदुर्बळांसाठीं हा विधि नाहीं.

याही दृष्टीनें श्री वेलणकरांची ह्या विधीसाठीं पात्रता आहे, नाहीं हें पाहणें इष्ट होतें. व समाधानाची गोष्ट ही कीं एका धनावांचून इतर सर्व दृष्टीनें श्री वेलणकर हे बहुतांश पात्र आहेत असें दिसून आलें. वय ४८ असून ब्रह्मचारी आहेत. सात्विक वृत्तीचे आहेत. केवळ उदरपूर्तीसाठीं घड्याळें दुरुस्तीचा व्यवसाय ते करीत असले तरी तो केवळ उत्पन्नभक्ष्यभोजी अशा स्वरूपांतच केला, केवळ १ शेंगदाणा रोज खावा आणि अशा रीतीनें ४ चार ६ सहा महिने श्रीक्षेत्र गाणगापूर, औदुंबर, नरसोबावाडी ह्या ठिकाणीं इष्ट दैवत श्रीदत्तात्रेयाचें ध्यान, जप, अनुष्ठानांत घालवावे; विशेष लक्षांत घेण्यासारखे आजार झालेले नाहींत, कुणाशीं भांडण वा शत्रुत्व नाहीं एकांत-

प्रियता, सत्यप्रियता, देवधर्म निष्ठा इ० इ० पुष्कळच गोष्टी अनुकूल अशा दिसून आल्या. धनसंपन्नता आणि शुश्रूषा करणारा परिवार यांचीच उणीव ह्या कामीं भासणार होती.

## अयोग्य व्यक्ति.

रसायनकल्पाच्या प्रयोगाला योग्य अशी श्री वेलणकर व्यक्ति आहे असें वरील वर्णनावरून ठरलें असलें तरी अयोग्यतादर्शक कांहीं गोष्टी त्यांचे ठिकाणीं आहेत कीं काय हाही विचार करणें इष्ट होतें. म्हणून गुणांबरोबर दोष दृष्टीनेंही श्री वेलणकरांचें परीक्षण व निरीक्षण करावें लागलें. श्रीसुश्रुताचार्यांनीं या बाबतींत सात गोष्टींचा उल्लेख केला आहे. तो असा–

**अथ सप्तपुरुषाः रसायनं नोपयुंजीरन्; तद्यथा- अनात्मवान्, अलसः, दरिद्रः, प्रमादी, व्यसनी, पापकृद् भेषजापमानी चेति। सप्तभिः एव कारणैः न संपद्यते- अज्ञानात् अनारंभात् अस्थिरचित्तत्वात् दारिद्र्यात् अनायत्तत्वात् अधर्मात् औषधालाभाच्चेति ॥**

॥ सु. चि. २७।४ ॥

सात प्रकारच्या लोकांनीं रसायन प्रयोगाच्या भरीस पडूं नये ते म्हणजे मनावर ताबा न ठेवूं शकणारे, आळशी, दरिद्री, कुपथ्य करणारे, व्यसनी, पापाचारी आणि औषध किंवा उपचारांवर अश्रद्धा व ते देणाराचा अपमान करणारा असे होत. कारण ह्या ७ ही कारणांत अज्ञानामुळें प्रयोगाला आरंभच न करणें, केल्यावर चित्ताची अस्थिरता असल्यानें तो अपूर्ण सोडून देणें, दारिद्र्यामुळें पथ्यादीसाठीं आवश्यक ती साधनसामुग्री जुळवतां न येणें, मनावर ताबा नसल्यानें व अधर्माचरण प्रवृत्तीमुळें आहार विहारादींच्या निर्बंधांचें परिपालन न होणें आणि मुळांतच निश्चयाची बळकटी नसणें, श्रद्धा व तळमळीचा अभाव असल्याने इष्ट त्या औषधादींची ही प्राप्ति न होणें अशा प्रकारच्या आपत्ति संभवतात आणि रसायनप्रयोगांत यश मिळत नाहीं.

श्री वेलणकरांच्या जवळ या तऱ्हेचे दोष नाहींत हें स्पष्ट झाल्यावर मग सर्वांनुमतें हा रसायनकल्पविधी प्रयोग म्हणून एक साहसच करण्याचें निश्चित झालें. आर्थिक प्रश्न मात्र फार मोठा व महत्वाचा ह्या प्रयोगाच्या सिद्धीसाठीं उभा असलेला प्रश्न होता. श्री वेलणकरांच्या आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें त्यांनीं धनाशिवाय सर्वस्व देण्याचें मान्य केलें, ही गोष्ट फार मोठी व त्यांच्या त्यागवृत्तीची साक्ष पटवणारी असली तरी त्याच्या कितीतरी पटीनें ह्या प्रयोगासाठीं आर्थिक व्यय करावा लागणार होता. परंतु अभूतपूर्व अशा ह्या कार्यासाठीं आतां आयुर्वेदभवन संस्थेनेंही आपलें कार्यकर्तृत्व पणाला लावण्याचें ठरवून अनंत हस्तांच्या दात्या जनताजनार्दनावर आपल्या ह्या सत्यसंकल्पाची तो भगवान कधीच उपेक्षा करणार नाहीं ह्या दृढ विश्वासानें हें महत्कार्य हातीं घेण्याचा निश्चय करून श्री वेलणकर यांना त्या रसायन कल्पाच्या प्रयोगासाठीं आयुर्वेदभवनांत दि. २८।१०।६५ ह्या दिवशीं प्रविष्ट करण्यांत आलें.

## रसायन विधीचे प्रकार.

रसायन चिकित्सेची थोडक्यांत कल्पना या पूर्वीच दिली आहे. त्यावरून आरंभीं एखाद्या जुन्या वा नव्या स्वरूपांत असलेल्या रोगाला नष्ट करणें व नंतर कोणत्याही विकाराचें पुनः आक्रमण होऊं नये व शरीर घटक निर्दोष, विशुद्धतर व्हावें आणि शरीर तेजःपुंज व बलवीर्यसंपन्न होऊन दीर्घजीवी व्हावें असें उभयविध कार्य ह्या विधीनें करावयाचें असतें हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे.

अर्थातच अशा उभयविध कार्यासाठीं निरनिराळ्या अनेक रसायनकल्पांत औषधींची योजना असणार हें क्रमप्राप्तच आहे. ज्यांना विकार कोणताच नाहीं परंतु यापुढील आयुष्यांत जरा प्राप्त होऊं नये व निरामय दीर्घायुष्य लाभावें अशी आवश्यकता असेल त्यांच्यासाठीं तशी स्वतंत्र रसायनकल्पाची योजना करावी लागते. या दृष्टीनें सुश्रुताचार्यांनीं सर्वोपघातशमनीयरसायन २ मेधायुष्कामीयरसायन ३ स्वभावव्याधिप्रतिषेधनीयरसायन, आणि निवृत्तसंतापीयरसायन असे ४ प्रकार ह्या रसायनविधीचे कल्पून त्यासाठीं निरनिराळ्या औषधींचे कल्प, त्यांची कृति, त्यांचा सेवन विधि, त्याच्या परिणामांचें क्रमशः दिग्दर्शन, व त्यासाठीं पाळावयाचा आहार आणि आचार ह्यांचें सविस्तर वर्णन केलें आहे.

चरकाचार्यांनीं प्रथम हिरडा आणि आंवळा ह्या दोन प्रधान द्रव्यांपासून करावयाच्या रसायनकल्पांचें वर्णन केलें आहे. हिरड्याला 'कायस्था' म्हणजे शरीर सुस्थितींत ठेवणारें द्रव्य आणि आवळ्याला 'वयस्था' म्हणजे

तारुण्य टिकवणारें द्रव्य या दृष्टीनें आयुर्वेदांत फार मोठें महत्त्व असून अगस्ति-हरीतकी-अवलेह, ब्राह्मरसायन च्यवनप्राश इ० इ० कल्प ह्या औषधीचे तयार करून रसायन पद्धतीनें त्यांचा उपयोग प्रतिपादन केला आहे. या शिवाय प्राणकामीय, करप्रचीतीय, आयुर्वेदसमुत्थानीय असे रसायन प्रकार निवेदन केले आहेत. ह्या रसायनकल्पाचे अद्भुत चमत्कार व परिणाम सुश्रुत व चरक अशा दोन्हीही संहितांतून वर्णन केलेले आढळतात. ते सांगण्याचें हें स्थळ नव्हे ग्रंथांतूनच ते जाणून घेणें बरें.

## अपूर्ण माहिती.

श्री वेलणकरांना मिळालेली माहिती खरी असली तरी ती अपूर्ण होती. हें येथें मुद्दाम नमूद केलें पाहिजे. आवळ्याच्या झाडावर बसून आवळे खावे आणि दूध प्यावें म्हणजे कायाकल्प होतो हा श्री वेलणकरांना सांगणारांनीं रसायनकल्पाचा उत्तरार्ध सांगितल्यामुळें ती माहिती अर्धवट ठरते. कारण झाडावर चढून आवळे खाण्यापूर्वी एक वर्षभर त्या व्यक्तीनें शास्त्रोक्त पद्धतीनें रसायनकल्प सेवन करून एक वर्षभर केवळ दुग्धाहार करावा. गाईंच्या कळपांतच वावरावें. ब्रह्मचर्यव्रत पालन करून इष्ट देवतेचा जप करावा आणि असें एक वर्ष घालवल्यानंतर पौष, माघ अथवा फाल्गुन महिन्यांत तीन दिवस उपवास करून पौर्णिमा तिथीला आवळ्याच्या झाडावर चढून उत्तम मोठे व पक्व फळ झालेले आवळे मनसोक्त खावे. म्हणजे दीर्घायुष्य प्राप्त होतें असें हें त्याविषयींचें संपूर्ण शास्त्र आहे. भपकेदार वर्णन असलेल्या जाहिरातींवर विश्वास ठेवून गिऱ्हाइकांची फसगत झाल्याची उदाहरणें आपण पहातों तसाच हा अपूर्ण माहितीचा प्रकार श्री वेलणकरांच्या बाबतींत घडला होता ही गोष्ट खरी आहे.

## आवश्यक वय.

रसायनविधीचा तात्त्विक अर्थ दृष्टीपुढें घेतला तर अगदीं जन्माच्या पहिल्या दिवसापासून आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत स्वास्थ्यरक्षण आणि व्याधिपरिमोक्षाचें कार्य यशस्वी व्हावें ह्या उद्देशानें आयुर्वेदशास्त्रानें अनेक औषधींचे रसायनप्रयोग सांगितले आहेत. नूतन बालकाला बुद्धि, बल, वर्ण इ० प्राप्त होण्यासाठीं अगदीं जन्मापासून सुवर्णप्राशनाचे प्रयोग वर्णिले आहेत, तसेच वृद्धांनाही शक्ति, बुद्धि, बलादि क्षीण होऊं नये व व्याधींचेंही सहसा आक्रमण होऊं नये म्हणून औषधियोग रसायनें सांगितलीं आहेत. तथापि रसायनविधीचा चिरस्थायी परिणाम व्हावा आणि शरीर जराजर्जर होऊं नये यासाठीं प्रारंभीं वयाच्या ज्या चार अवस्था निवेदन केल्या आहेत त्यांतल्या जराप्राप्त होण्यापूर्वींच्या दोन अवस्था रसायनकल्प करण्याला योग्य होत. त्या म्हणजे शारीरधातुघटकांची वाढ पूर्ण होण्याचा ( वयाच्या २५ ते ४० वर्षांच्या कक्षेंतील ) १५ वर्षांचा काळ होय आणि त्यानंतर मध्यवयाचा काळ म्हणजे ४० वयाच्या पुढें आणखी १०।२० वर्षें म्हणजे ५० अथवा अधिकांत अधिक ६० च्या वर्षापर्यंतचा होय.

'पूर्वे वयसि मध्ये वा तत् प्रयोज्यं जितात्मनः' (अ.हृ.उ. ३९।३) असा शास्त्राचा दंडक आहे. निसर्गांच ज्या वयांत क्रमशः शक्तिबुद्धि क्षीण करीत आहे त्या स्थितींत हा विधि करणें म्हणजे पडक्या घराची तात्पुरती लिपछापच होणार! थकलेल्या घोड्याला चाबूक फटकारून चालायला भाग पाडणेंच होय. परंतु संपूर्ण धातुघटक जोमांत असतांना तो जोम टिकवून ठेवणें आणि वाढवणें त्याच प्रमाणें सर्वही धातुघटक शरीरांत स्थिर झाले असून पुढें लौकरच त्यांची उतरती भाजणी सुरू होणार आहे अशा संधीलाच जर योग्य दक्षता घेऊन हा विधि केला गेला तर निश्चितच तो संपूर्णतया जरा-व्याधिवर्जित असें दीर्घायुष्य उपभोगणारा होईल.

## —कुटीप्रवेशपूर्वक रसायन विधि—

रसायनाच्या प्रकारांचें थोडें दिग्दर्शन वर केलें आहेच. तथापि विशिष्ट विधिपूर्वक सेवन केलेल्या रसायनकल्पाचें महत्त्व आगळेंच आहे. अशा विधीला शास्त्रकारांनीं 'कुटीप्रावेशिक विधि' असें नांव दिलें असून ह्या विधि विरहित नित्याचे व्यवहार चालू ठेवूनही रसायन कल्प सेवनानें फलप्राप्ती होते असा जो रसायनसेवनाचा विधि त्याला 'वातातपिक' विधि असें शास्त्रीय नांव आहे. 'चणे खावे लोखंडाचे, तेव्हां ब्रह्मपदीं नाचे' असा साक्षात्कार देणारा कुटीप्रावेशिक विधि आपला खरा साक्षात्कार दाखवतो, पण त्यासाठीं तपश्चर्येचे खडतर नियम कटाक्षानें पाळावे लागतात. 'योग्य व्यक्ति' ह्या मुद्याचें प्रतिपादन करतांना ह्या नियमांचें स्वरूप सांगितलें आहेच, आणखीही कांहीं गोष्टी पुढें येतीलच.

कुटीप्रावेशिक विधीचें पालन करून रसायन कल्प सेवन करणारी व्यक्ति ऐहिक जीवनापेक्षां उच्चतर जीवनाच्या पातळीवर पोंचत असते. मानवजन्माचें अंतिम साध्य म्हणून म्हटला जाणारा मोक्ष प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीनें जी एक विशिष्ट मनोभूमिका असावी लागते तिचा पाया भक्कम होणें ही एक गोष्ट प्रापंचिक जीवन व्यतीत

करणाऱ्या व्यक्तीच्या पेक्षां ह्या रसायन विधीच्या 'कुटी-प्रावेशिक' पद्धतीनें अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण होत असते म्हणूनच ह्या पद्धतीचें महत्त्व अधिक गौरवानें प्रतिपादन केलें गेलें आहे.

## रसायनाचे लाभ.

दीर्घमायुः स्मृतिं मेधां आरोग्यं तरुणं वयः ।
प्रभावर्णस्वरौदार्यं देहेंद्रियबलं परम् ॥
वाक्सिद्धिं प्रणतिं कांतिं लभते ना रसायनात् ।
लाभोपायो हि शस्तानां रसादीनां रसायनात् ॥
॥ च. चि. १।१।८ ॥

अर्थ -दीर्घायुष्य, स्मरणशक्ति, बुद्धि, आरोग्य, तरुण वय, कांती. उत्तम रूप, आवाज चांगला शारीर व मानसिक इंद्रियबल, वाणीचें सामर्थ्य, नम्रता, सौंदर्य ह्या सर्व गोष्टी यथाविधि रसायन सेवनानें प्राप्त होतात. संपूर्ण शरीराचे रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा आणि शुक्र हे धातुघटक शस्त म्हणजे विशुद्धतर होतात; असा हा रसायनकल्प आहे.

अध्यात्मप्रवृत्तीचे श्री. वेलणकर यांना स्वतः कायाकल्प करून घ्यावा ही लागलेली तळमळ केवळ शरीर सुदृढ, दीर्घायु व्हावें आणि ऐहिक उपभोग भोगावे यासाठीं नव्हती; तर अशा ह्या निरामय दीर्घजीवी शरीराच्या बळावर जीविताचें अंतिम साध्य अशी मोक्षसाधना करण्यासाठीं जी जपानुष्ठानादि तपश्चर्या करावयाची ती उत्तमप्रकारें साधावी म्हणूनच शारीर व मनोबल वाढावें, शांती, समाधान आणि स्थैर्य निर्माण व्हावें हा त्यांचा हेतु होता आणि तो हेतु साध्य होण्यासाठीं लागणारें मनाच्या संयम आणि दृढ निश्चयाचें भांडवल त्यांनीं जमवलें होतें. हें लक्षांत घेऊनच कुटीप्रवेश रासायन विधीचा प्रयोग करण्याचें आयुर्वेद भवन संस्थेनें निश्चित केलें.

## साधन-सिद्धता.

कुटीप्रावेशिक विधीची सिद्धता ही सुद्धां सामान्य गोष्ट नव्हे. यासाठीं सर्व प्रथम कुटिनिर्माण करणें आवश्यक असतें; त्यानंतर त्या कुटींत प्रवेश करणाऱ्या व्यक्तीसाठीं लागणाऱ्या उपचारांची सर्वांगपूर्ण जमवाजमव अगोदरच करून ठेवावयाची असते. तिसरी गोष्ट त्या व्यक्तीला कुटींत प्रविष्ट केल्यानंतर केल्या गेलेल्या उपचारांचे परिणाम अगदीं बारकाईनें पाहून त्यांची नोंद ठेवणारे सहाय्य चिकित्सक आणि अवस्थापरत्वें उपचारांचें मार्गदर्शन करणारे प्रधान चिकित्सक यांची योजना असली पाहिजे व आणखी एक महत्त्वाची गोष्ट ह्या कुटीप्रविष्ट व्यक्तीच्या सेवाशुश्रूषेसाठीं म्हणजेच कुटीची व्यवस्था, त्या व्यक्तीच्या वस्त्रपात्रादींची व्यवस्था, वेळेवर औषधीकल्प आणि पथ्याहार देण्याची व्यवस्था ह्यासाठीं दक्ष असा वर्ग असला पाहिजे. त्याची विस्तृत कल्पना यावयालाच पाहिजे. म्हणून त्या चारही गोष्टींबद्दल शास्त्रीयदृष्ट्या लिहिणें आहे.

(१) कुटीची रचना–

नृपवैद्यद्विजातीनां साधूनां पुण्यकर्मणाम् ।
निवासे निर्भये शस्ते प्राप्योपकरणे पुरे ॥
दिशि पूर्वोत्तरस्यां च सुभूमौ कारयेत् कुटीम् ।
विस्तारोत्सेधसंपन्नां त्रिगर्भां सूक्ष्मलोचनाम् ॥
घनभित्तिं ऋतुसुखां सुस्पष्टां मनसः प्रियाम् ।
शब्दादीनां अशस्तानां अगम्यां स्त्रीविवर्जिताम् ॥
इष्टोपकरणोपेतां सज्जवैद्यौषधद्विजाम् ॥
॥ च. सं. चि. १।१।१७-२० ॥

ही कुटी ज्या ठिकाणीं करावयाची तें स्थान राजधानीच्या सांनिध्यांत व राजपुरुषांच्या नेतृत्वांत असावें, त्या ठिकाणीं अगदीं पाहिजे त्या वेळीं वैद्य उपस्थित होऊं शकतील असें तें ठिकाण असावें. ब्राह्मणांच्या वेदघोषांनीं आणि सदैव पुण्यकर्मांत निमग्न असणाऱ्या साधु पुरुषांच्या, संत महात्म्यांच्या निवासानें पुनीत झालेली अशी ती पुण्यभूमि असावी. कुटीसाठीं निवडलेला प्रदेश निर्वात आणि सर्व प्रकारें निर्भय अर्थातच हिंस्र प्राण्यांचा श्वापदांचा व दुर्जनांचा उपसर्ग पोंचणार नाहीं असा असावा. कुटींत असेतों लागणाऱ्या औषधी वनस्पती आणि उपचार साधनें व उपकरणें केव्हांही मिळूं शकतील अशी नगरी ह्या स्थानाच्या जवळच असावी. अशा प्रकारची कुटीप्रदेशाची निवड केल्यावर त्या प्रदेशांत जी कुटी बांधावयाची ती भूमि समतल, दलदल नसलेली वारुळें बिळें नसलेली व इमारत बांधावयास योग्य असावी.

गांवाच्या पूर्वोत्तर म्हणजे ईशान्य दिशेला भरपूर लांब, रुंद व उंच अशी तीन परिसर युक्त व अगदीं सूक्ष्म छिद्रें किंवा जाळ्या असलेली पक्क्या भिंतींनी युक्त, सर्वही ऋतूंत हवामानाचा त्रास होणार नाहीं अशी स्वच्छ मनाला प्रसन्न वाटेल अशी असून अभद्र, अश्लील शब्द ऐकूं येऊं नयेत, अशी योजना तेथें असावी. स्त्रियांनाही तेथें प्रवेश नसावा व आवश्यक तीं साधनें, उपकरणें नित्य तयार असून वैद्य, औषधें व ब्राह्मणाचें साहचर्य हवें तेव्हां प्राप्त होण्याचीहि तेथें व्यवस्था असावी.

शास्त्राच्या ह्या आज्ञेनुसार श्री. वेलणकरांसाठीं करावयाच्या कुटीकरतां मग जागेचा शोध सुरू झाला. प्रत्यक्ष मुंबई नगर सर्व साधनसंपन्न खरें परंतु आपल्या ह्या पद्धतीप्रमाणें सर्व गोष्टी येथें जुळणें शक्य नव्हतें. अशा चिंतेंत असतांच सत्य संकल्पासाठीं दाता भगवान धावून आला—

## श्री. वेलणकरांसाठीं केलेली कुटी.

कुटीची रचना ही वास्तुशास्त्राच्या आधारानेंच व्हावयास पाहिजे, अर्थातच त्या करितां वास्तुशास्त्र कुशल व्यक्तीचें साह्य मिळवतां आलें. परंतु मुख्य प्रश्न जागेचा होता. तो सोडविण्यासाठीं ठाणें जिल्ह्यांत वज्रेश्वरीजवळ असलेल्या गणेशपुरी आश्रमाचे महंत श्रीनित्यानंद स्वामींचे शिष्य व गणेशपुरीच्या आश्रमाचे प्रमुख महंत श्रीमुक्तानंद स्वामीजींनीं आयुर्वेदभवनास अचानक भेट दिली. आयुर्वेदभवनाच्या कार्याविषयींची माहिती आणि कार्यकर्त्यांशीं श्रीस्वामीजींचा पूर्वपरिचयही असल्यानें स्वामीजींनीं याही वेळीं भवनाच्या कार्याविषयीं आस्थेनें चौकशी केल्यावर त्यांच्या कानीं ह्या कुटी प्रावेशिकरसायन कल्पाचें वृत्त संचालकांनीं घातलें. त्या विषयींच्या सर्व साधनांच्या जुळवणीची कल्पना दिली. श्री. वेलणकरांविषयींचें सर्व निवेदन केलें, तेव्हां चालकांनीं विनंती करण्यापूर्वींच स्वामीजींनीं "हा सर्व विधि आमच्या गणेशपुरीच्या भूमींत यथासांग होईल. हवें तें सर्वप्रकारचें साह्य तेथें मिळेल. चिंता करण्याचें मुळींच कारण नाहीं. आश्रमाच्या परिसरांत कुटी बांधण्याची व्यवस्था होऊं शकेल, आसपासचा संपूर्ण वनप्रदेश पळसाच्या प्रचंड वृक्षांनीं समृद्ध आहे. आवळे, गाईचें दूध ह्या गोष्टी दुर्मिळ नाहींतच व ह्या कामासाठीं हवें तेवढें मनुष्यबळही सर्वप्रकारच्या खटपटीसाठीं तयार आहे. कोठेंही शोधाशोध न करतां गणेशपुरीलाच हा विधि होऊं द्या." असें स्वतःच उत्स्फूर्त आग्रहानें सांगितलें. आंधळ्यानें एक तरी डोळा मिळावा म्हणून देवाची प्रार्थना करावी व त्यानें प्रसन्न होऊन दोन्ही डोळे द्यावे म्हणजे जसा आनंद त्या आंधळ्याला व्हावा त्याहूनही अधिक आनंद आयुर्वेदभवनच्या संचालक-मंडळास झाला आणि कार्याच्या उत्साहाला भरतें आलें. संचालक-मंडळाचे सदस्य एक दिवशीं गणेशपुरीला गेले. तेथील आश्रम, सभोंवतालचें पवित्र वातावरण, पळसाच्या झाडांनीं व्याप्त वनप्रदेश आणि आश्रमाधिपति श्रीमुक्तानंद महाराजांचा उत्साहप्रद आशीर्वाद ह्या सर्व गोष्टी मनासारख्या येथें लाभतील ही मनोमय खात्रीही सर्व सदस्यांना पटली आणि वास्तुशास्त्र निष्णाताच्या नेतृत्वाखालीं तेथें आश्रमाच्या जवळच पण संपूर्णतया एकांत प्रदेशांत कुटी निर्माण करण्याचें निश्चित ठरलें. ह्या संपूर्ण कार्यांत जातीनें लक्ष घालण्याचें आश्वासन स्वामीजींकडून मिळाल्यानें कुटी निर्माण विषयीच्या एका महत्त्वाच्या समस्येंतून भवनच्या सदस्यांची सुटका झाली. श्री स्वामीजींनीं इकडील पूर्वतयारी होईतों हें कुटिनिर्माण कार्यही पूर्ण केलें त्या कुटीचें वर्णन थोडक्यांत असें शब्दचित्रांनेंच करतां येईल.

## कुटीचें वर्णन.

विस्तार व उत्सेध संपन्न कुटी म्हणजे किती लांब, रुंद, उंच असावी हें मोजमाप ग्रंथांतून सांगितलेलें नसल्यानें वास्तुविद्याकुशल अशा व्यक्तीचें साह्य घेतलें गेलें. एकांत एक अशा तीन परिसरयुक्त तीन खोल्यांची ही कुटी करावयाची आहे. ह्या पैकीं सर्वांत मधली खोली हीच प्रथम श्री. वेलणकरांच्या निवासाकरितां असणार! सर्व साधारण १२ फूट लांब १२ फूट रुंद अशी खोली एका व्यक्तीला मोकळेपणीं राहाण्यास पुरेशी असते ह्या हिशेबानें दुसऱ्या व तिसऱ्या खोल्यांची लांबी रुंदी क्रमशः ३६×३६ आणि ६०×६० फूट अशी ठेवली गेली. याच्या उलट उंचीच्या दृष्टीनें अधिकांत अधिक अशी १८ फूट उंची पहिल्या खोलीची १६ फूट दुसऱ्या व १२ फूट तिसऱ्या म्हणजे बाहेरच्या खोलीची ठेवली गेली. यामुळें सर्वांचें मिळून असलेल्या वरील छपराला उतार क्रमशः चांगला आला.

कुटीच्या भिंती, खांब, दरवाजे, आणि वरील छप्पर वर सांगितल्याप्रमाणें उंच-ह्या तीनही खोल्यांच्या भिंती ह्या वनांतच मिळणाऱ्या कारवीच्या झाडाच्या काड्यांच्या कुडाच्या तयार केल्या गेल्या. हें कूड शेणामातीनें लिंपून आणि सारवून घेतलें गेलें.

खांब—कुटीची उभारणी भिंतीवर असली तरी आधार म्हणून खांब हवेच होते ते सर्व सागवानी लाकडाचे दिले गेले. प्रमुख खांब १२।१२ फूट अंतरावर देऊन त्यांना मधून साह्यक खांब बांबूचे दिले गेले.

दरवाजे—आंतील खोलीचा पश्चिमेकडचा दरवाजा कायमचा बंद आणि उत्तरेचाही तसाच पण वाळ्याच्या पडद्यासारखा गुंडाळून घेतां येण्यासारखा कारवीचा व आंतून गोणपाट लावलेला पडदा सोडलेला असावयाचा.

त्याच्या बाहेर दुसऱ्या परिसरांतील दरवाजा दक्षिणेस उघडा. व तिसऱ्या म्हणजे सर्वांत बाहेरील परिसरांत

पूर्वदरवाजा अशाच पडद्यानें बंद ठेवण्यांत आला. हे पडदे ६×४ मापाचे केले गेले.

छपर—कुटीचें वरील छपर हें गवत आणि कुडाच्या काड्या व बांबूच्या साह्यानें दोन्याबांधून उतरतें असें केलें व त्यांतच मधून मधून गवत विरळ करून लहान लहान झरोके ठेवले गेले. भिंतीच्या कुडांनाही दुसऱ्या व तिसऱ्या परिसरांत असे तुरळक झरोके ठेवले गेले.

कुटीचा पाया व तळ—कुटीचा पाया सर्व बाजूंनी ३ फुटांचा घेतला गेला.

कुटीचें तळ—वनांत उभारावयाच्या ह्या कुटीचें तळ तयार करण्यांत विशेषच दक्षता घ्यावी लागली. ह्या तीनही परिसरांतील तळ तयार करण्यासाठीं जमीन खणून काढून मुरुमाच्या थरांनीं ती पक्की करावी लागली. आवश्यकतेच्या दृष्टीनें पहिल्या खोलींत १८ इंच, दुसरींत १२ इंच आणि तिसरींत ६ इंच मुरुमाचा थर घालून ठोकून पक्की केल्यावर हें कुटीनिर्माण पूर्ण झालें.

## व्यवस्था.

ह्या कुटीच्या पहिल्या खोलीला आतां अंतर्गर्भाचें स्वरूप आलें व त्याबाहेर दोन परिसर असे मिळून शास्त्रोक्त पद्धतीची ही त्रिगर्भा कुटी तयार झाल्यावर ह्या रसायन प्रयोगाचे क्षेत्रपुरुष श्री. वेलणकर ह्यांना ह्या गर्भवासकाळांत लागणारी सर्व तयारी अर्थातच प्रत्यक्ष प्रवेशापूर्वीच करणें इष्ट होतें. त्या दृष्टीनें व्यक्तिशः श्री. वेलणकरांसाठीं केलेली तरतूद--

१ झोपण्या, लोळण्या वा बसण्यासाठीं ६ × ३ मापाची खाट खैराच्या लाकडाची मुद्दाम तयार करवून ती काथ्याच्या दोरीनें विणून ठेवली.

२ आंथरण्याठीं कापसाची गादी, तिच्यावर चादर, आणि उशी; व पांघरण्याठीं सुती व प्रसंगवश लागल्यास गरम चादर.

३ डांसांचा त्रास न व्हावा म्हणून मच्छरदाणी.

४ जमिनीवर संपूर्ण काथ्याची चटई ( मॅटिंग ) आंथरून नवीनच तयार झालेल्या ह्या कुटीच्या तळांत राहिलेला अल्पस्वल्प ओलावा न बाधावा ही योजना.

५ कंटाळा येईल अथवा जपजाप्य इ० साठीं खालीं बसावयाचें असेल तेव्हां बसण्याकरितां दर्भाचें १ व त्यावर लोकरीचें आसन.

६ मलमूत्रविसर्जनासाठीं वा अन्य कारणास्तव लागल्यास प्रकाशाच्या साह्यानें जातां यावें म्हणून मंद प्रकाशाची छोटी विजेरी ( बॅटरी ).

७ विशिष्ट कारणासाठीं सूचना पाठवणें, निरोप देणें वा हवें असेल तें सांगण्यासाठीं सेवकाला कळण्याकरतां घंटी बाहेर व तिची दोरी श्री. वेलणकरांच्या परिसरांत त्यांचे हाताशीं असावी ही योजना.

८ कपडे व सामान--अंगावर कोपरी ( अंडरवेअर ), अंगरखा, धोतर, पंचे, हात पाय तोंड पुसण्यासाठीं लहान मोठे रुमाल.

९ मलमूत्रविसर्जन व नंतर हातपाय धुण्यासाठीं. तिसऱ्या म्हणजे मोठ्या बाह्य परिसरांतील वायव्य कोपऱ्यांत शौचकूप, त्यांत चिनीमातीचें शौचपात्र ( फ्लशिंग संडासांत असतें तसें ) त्याच्या बाह्यमार्गी पाणी सांठण्याचा खड्डा व दुर्गंध वर निघून जावा म्हणून त्याला जोडलेल्या नळाची ( गॅसपाइप ) योजना.

संडासाच्या शेजारींच हात पाय धुण्यासाठीं, चूळ भरण्यासाठीं मोरीची योजना.

बाह्य परिसरांत–सर्वांत बाहेरच्या मोठ्या परिसरांत २ खाटांची योजना. त्यांपैकीं एक शुश्रूषकासाठीं व दुसरी स्थायी वैद्यासाठीं. तेथेंच शिवाय २ लाकडी स्टुलें, पाण्याच्या बादल्या, दिवे, समई, कोपऱ्यांत घंटीची योजना. थर्मास मध्यें गरमपाणी, बेडपॅन, ( शौचपात्र ), युरिनपॉट ( मूत्रपात्र ), थुंकण्यासाठीं भांडें, किडनी ट्रे ( ओकारी, थुंकी, शौच, मूत्र, तपासणीपूर्वी ठेवण्याकरतां )

कुटीची ही सर्व योजना गणेशपुरीला होत असतांच आयुर्वेदभवनाच्या रुग्णालयांत श्री वेलणकरांचा २८।१०।६५ ला प्रविष्ट केल्याचा उल्लेख वर आलाच आहे. प्रत्यक्ष रसायनकल्प सुरू करण्यापूर्वी त्या व्यक्तीची देहशुद्धि व्हावयास पाहिजे अशी शास्त्राज्ञा आहे. जसा कपड्याला अथवा भिंतीला रंग देण्यापूर्वी तें वस्त्र अथवा ती भिंत स्वच्छ करून पूर्वीचा रंग व मळ संपूर्ण काढून लावला तरच दुसरा रंग नीट बसतो तसाच देहशुद्धीवांचून हा रसायनकल्पही व्यर्थ ठरतो. या दृष्टीनें श्री वेलणकर यांच्या प्रकृतीचें परीक्षण, त्यांच्या स्वभावाचें आणि प्रवृत्तीचें निरीक्षण आयुर्वेदभवनच्या वैद्य सदस्यांनीं आपापल्यापरी स्वतंत्र आणि सर्वांनीं मिळून असें अनेक वेळां केलें. आणि श्री वेलणकर यांना वाग्भटोक्त आमलकरसायन द्यावें असा सर्वानुमतें निर्णय घेतला. व त्याला अनुसरून श्री वेलणकरांना

देहशुद्धीसाठीं आयुर्वेदोक्त पंचकर्मचिकित्सा म्हणजे शुद्धीचीं पांच कर्मे स्नेह, स्वेद, वमन, विरेचन आणि बस्तिविधि अशीं असून ऊर्ध्वांग म्हणजे मस्तकाकडील भागाच्या शुद्धी-साठीं नस्य आणि सार्वदेहिक रक्ताच्या शुद्धीच्या दृष्टीनें अस्र-विस्रुति करण्यांत आली. ह्याप्रत्येक कर्मानंतर पेया, विलेपी इ० आहार, पूर्ण विश्रांती देऊन नित्याचा आहार सुरू करावयाचा; बलप्राप्ति झाल्यानंतर मग दुसरें शुद्धिकर्म करावयाचें अशी ही शास्त्रोक्त प्रक्रिया आहे. ह्या पंच-कर्मांपैकीं पहिलें स्नेहकर्म केलें गेलें. स्नेह म्हणजे देहाला आंतून बाहेरून स्निग्ध करणें. आंतून स्नेहन व्हावें म्हणून श्री. वेलणकरांच्या प्रकृतीचा विचार करून इंदुकांतघृत मुद्दाम तयार करण्यांत आलें. ह्या घृतासाठीं लागणाऱ्या औषधींत दशमुळें हीं वातकफनाशक अशीं प्रमुख आहेत. ह्या दशमुळांपैकीं बरींचशीं मुळें संदिग्ध व आपल्याकडे न मिळणारीं अशीं होतीं तीं केरळ प्रांतांतून मागवण्यांत आलीं. तिकडे वात विकारासाठीं स्नेह व स्वेदनादि क्रियांचा फार प्रघात असल्यानें दीर्घकालाच्या अनुभवानें त्यांच्याकडे तीं निश्चित व शास्त्रोक्त गुण देणारीं अशीं वापरलीं जातात अशी माहिती मिळाली होती. त्याप्रमाणें तीं मागवलीं व तें इंदुकांत घृत तयार केलें. हें घृत सिद्ध करण्याकरितां गाईच्या दुधापासून काढलेलेंच तूप असावें असाही शास्त्रीय आदेश असल्यानें तेंही तसें केलें. बाहेरूनही शरीराला तेलाची मालिश करण्यांत आली. त्याकरतां नारायण तेल घेतलें.

नंतर विरेचनासाठीं श्रेष्ठ द्रव्य निशोत्तर म्हणून शास्त्रांत वर्णिलें आहे; पण महाराष्ट्रांत उपलब्ध निशोत्तर ५।५ तोळे वापरूनही कार्यकर होत नाहीं असा अनुभव असल्यानें तेही डॉ. रामदेवन्, सदानंद फार्मसी मु. पो. कोंडाला, केरळ येथून त्यांच्याकडील परंपरेच्या दृष्टीनें निःशंक म्हणून मागवलें. कफ बाहेर येईतों विरेचन व पित्त येईतों वमन दिलें गेलें. निशोत्तर १ तो+दूध ५ तो. पाणी ५ तो. साखर १ तो. उकळून केलेलें विरेचन दिलें गेलें.

वमन म्हणजे वांती करविणें या साठीं गेळफळ हें मुख्य द्रव्य आहे. शास्त्राप्रमाणें हीं गेळफळें ही वसंत ऋतूंत पक्व झालेलीं वापरलीं. बस्तिविधी काढ्याचा व तेलाचा क्रमशः दिला गेला. नस्यासाठीं देवदाली ( देवडांगरी )-चा उपयोग केला.

आयुर्वेदभवनमध्यें असलेल्या स्वेदनयंत्राच्या साह्यानें तें केलें गेलें. याप्रमाणें सर्वही पंचकर्मांचा विधि संपूर्ण होण्यास ५८ दिवस लागले. ह्या सर्वही कालांत श्री. वेलणकरांचा संयम आणि दृढनिश्चय चांगलाच दिसून आला. स्नेहपानासाठीं देण्यांत आलेलें औषधीसिद्ध तूप ५ तोळ्या पासून आरंभ करून वाढवीत वाढवीत क्रमशः २५–२८ तोळ्यांपर्यंत तें वाढवलें पण तेवढें तूप पितांना त्यांनीं कधींही तोंड वेडेंवांकडें केलें नाहीं कीं पिण्याचा कंटाळा दाखवला नाहीं. शेवटीं जुन्या मलशुद्धीसाठीं जवाचे कढण दिलें गेलें.

एवढ्या अवधींत गणेशपुरीला कुटीही तयार होत आली होती. आतां आंवळे आणि पळसाची झाडें यांची योजना होणें इष्ट असून संपूर्णतया त्या कुटींतला काळ दुग्धाहारावरच श्री वेलणकरांना कंठावयाचा होता. तेंही गाईचें दूध हवें होतें. ती गाय बाष्कायणी म्हणजे २ किंवा ३ वेळां फार तर व्यालेली असावी व तिला तिच्याच रंगाचा वत्स असावा असा ह्या बाबतींत शास्त्राचा आदेश असल्यानें नुसत्या दुग्धाहारावर राहाणाऱ्या व्यक्तीला पुरेसें दूध देणारी वरील वर्णनाची गाय मिळवण्याचे प्रयत्न करावे लागले व त्यांना यश येऊन मुंबईच्या पांजरापोळ-संस्थेनें तशी गाय देण्याचें मान्य केलें. एका वेळीं ३॥–४ शेरापर्यंत दूध देणारी ही गाय मिळाली.

त्या गाईचा आहार व तिचीही दिनचर्या शास्त्रोक्त पद्धतीनें ठेवण्याचा प्रयत्न केला गेला. कदाचित दूध अपुरें झालें तर आणखी हाताशीं असावें म्हणून ठाणें येथून श्री० भाऊ भटजी जोशी यांचे कडील गाय तशीच पण दोन्ही वेळचे मिळून २॥–३ शेर दूध देणारी सवत्स अशी मिळवली.

**आवळे**–आपल्याकडे मिळणाऱ्या आवळ्यापेक्षां मोठे चांगले आवळे व पुष्कळ दिवसपर्यंत जवळपूरकडे मिळतात असें समजलें म्हणून तेथून रोज ताज्या आवळ्यांचा करंडा यावा अशी योजना करावी लागली. एका वेळीं १२ किलो आवळे पेटाऱ्याच्या वजनासह येत गेले. आवळे १० किलो प्रत्येक आवळ्याचें वजन ३ ते ४ तोळे, रंग हिरवा व तांबूस छटा निर्माण झालेला असून देखाच्या बाजूला खड्डा असतो तो चांगला मानला गेला आहे म्हणून तशीच योजना केली गेली. आवळ्यांचा भाव सर्वसाधारण १ रु. किलो होता.

**पळसाचीं झाडें**–गणेशपुरीला झाडें पुष्कळ खरीं पण त्यांच्यावर नियंत्रण सरकारचें असल्यानें जंगल-खात्या-कडे मागणी करावी लागली. ५० झाडें या कार्यासाठीं मिळवलीं. तीं सर्व झाडें पत्रपुष्पांसह निवडून घेतलीं.

आवळे साठवण्याची पद्धति-पार्सल आल्यानंतर तें मोकळें करून ते आवळे वेताच्या करंडीत थर देऊन आंब्याच्या हिरव्या पानानें आच्छादून ठेवण्याची योजना करावी लागली.

## आमलक रसायन.

नीरुजार्द्रपलाशस्य छिन्ने शिरसि तत् क्षतम् ।
अंतर्द्धिहस्तं गंभीरं पूर्यमामलकैर्नवैः ॥
आमूलं वेष्टितं दर्भैः पद्मिनीपंकलेपितम् ।
आदीप्य गोमयैर्वन्यैः निर्वाते स्वेदयेत् ततः ॥
स्विन्नानि तान्यामलकानि तृप्त्या ।
खादेन्नरः क्षौद्रघृतान्वितानि ।
क्षीरं शृतं चानुपिबेत् प्रकामं ।
तेनैव वर्तेत च मासमेकम् ॥
वर्ज्यानि वर्ज्यानि च तत्र यत्नात् ।
स्पृश्यं च शीतांबु न पाणिनाऽपि ।
॥ अ. हृ. उ. ३९।२८-३० ॥

आमलक रसायन दररोज तयार करून देण्याचा हा विधि आहे.

हें रसायन या पूर्वी कधींच तयार केलेलें नसल्यानें चांगलें मोटें झाड पाहून त्याला पुढें १ नारळ ठेवून नमस्कार करायचा, आणि मुळाकडून वर ३॥ फुटावर तें तोडायचें, नंतर झाडाचा तो खुंट १॥ फूट कोरून उखळी-सारखा करावयाचा. २ इंच फक्त काठ राहील इतकी पोकळीची जाडी ठेवायची, त्या उखळींत मावणारे १५० ते २०० आवळे भरावयाचे त्यांवर खुंट कोरतांना निघा-लेला पळसाचा चुरा, पानें, गाईचें शेण आणि कमळें असलेल्या वळ्यांतील चिखल ह्या सर्वांचें लेपन करून बंद करायचें. शेवटीं खोडाभोंवतीं वरपर्यंत रानशेणी अर्धी गाडी आणि कोरडीं लाकडें सुमारें १—१॥ मण रचून पेटवावयाचीं. या प्रक्रियेनें ६ तासांत आवळे शिजून मऊ होतात. अग्नि आपोआप विझून शांत झाल्यावर पळसा-च्याच काटक्यांनीं वरील आवरण दूर करून हस्तस्पर्श न करतां ते आवळे काढून थर्मासमध्यें पळसाच्या काटक्यांनींच भरावयाचे व ते आणावयाचे. असा हा कार्यक्रम करावा लागला. रोज सकाळीं १० वा. झाड तोडणें, १० वाजेपर्यंत भट्टी लावण्यासारखी तयारी करणें. भट्टी सायं. ४ वाजेतो पेटत राहून सायं. ६ वा. शांत होते. व नंतर आवळे सकाळीं ७ वा. खाण्यासाठीं उपयोगांत आणिले जात. थंड होऊं नयेत म्हणून थर्मासमध्यें ठेवले जात. हा प्रयोग २।३ वेळां केल्यानंतरच हें सर्व तंत्र नीट जमलें. व पक्की कल्पना आल्यावर संपूर्ण महिना दीडमहिना सर्व सुरळित होऊं शकलें. ग्रंथांत फक्त मंत्र सांगितले पण तंत्र जमण्यास असा वेळ जावाच लागला.

## कुटीप्रवेश.

शरीरशुद्धि आणि कुटीनिर्माण व सर्व उपकरणांसह साधनांची सिद्धता झाली. या नतंर शुभ तिथि व नक्षत्र पाहून १ फेब्रुवारी १९६६ हा दिवस कुटीप्रवेशासाठीं निश्चित करण्यांत आला. तथापि मधलाही वृत्तांत थोडा सांगणें इष्ट आहेच.

श्री वेलणकरांवर कायाकल्पाचा प्रयोग होणार अस-ल्याची वार्ता सर्वत्र कर्णोपकर्णी पसरल्यामुळें सरकारी बिनसरकारी व्यक्ति, वृत्तपत्रांचे बातमीदार, जिज्ञासु लोक यांचेकडून भेटी, विचारणा, सूचनांचा सारखा ओघ आयु-र्वेदभवनकडे वाहूं लागला. आयुर्वेदीय पद्धतीनें सांगोपांग परीक्षण व उपचार होत आहेत व होणार असले तरी पाश्चात्य वैद्यकपद्धतीनेंही ह्या प्रयोगाच्या प्रारंभीं व प्रयोग सप्तमी नंतर परीक्षणाची नोंद केली गेली तर आधुनिक दृष्टिकोनांतून विचार करणारांनाही ह्या प्रयोगाचें प्रत्यंतर काय येतें तें समजून येईल अशी ही एक कल्पना पुढें आली व ती वावगी नाहीं असें वाटून पंचकर्मविधी चालू असतां व संपल्यानंतर त्या पद्धतीनेही निरनिराळ्या तज्ज्ञां-कडून प्रकृतिपरीक्षण आणि यांत्रिकपरीक्षण, मल, मूत्र, थुंकी, रक्त, बल इ० च्या बाबतींत करून तें नोंदून ठेवण्यांत आलें.

अशी सर्व सिद्धता झाल्यानंतर गणेशपुरीला श्री. वेलणकरांना ३१।१।६६ या दिवशीं नेण्यांत आलें व दुसरे दिवशीं म्हणजे १।२।६६ ला त्यांचें वपन व श्मश्रुकर्म करून सर्व केस काढवले गेले. त्यांना अभ्यंग-स्नान घालण्यांत आलें; वेदोक्त मंत्रविधीनें कुटीच्या भूमीचें उदकशांति विधानपूर्वक पूजन करण्यांत आलें. व आयुर्वेदभवनच्या व्यवस्थापक-मंडळाच्या सदस्य सौ० कमलाबाई करंदीकर व त्यांचे पति श्री बाबासाहेब करंदी-कर ह्या दंपतीकडून स्वस्ति-पुण्याहवाचन करण्यांत येऊन वेदोक्त आशीर्वाद मंत्रोच्चारणाच्या घोषांत श्री वेलण-करांना कुटीप्रवेश करविला गेला. प्रवेशापूर्वी त्यांनीं देव, ब्राह्मण, गणेशपुरीचे महंत श्री मुक्तानंद महाराज आयुर्वेद-भवनचे सर्व उपस्थित सदस्य, निमंत्रित मुंबई, ठाणे, पनवेल, चेंबूर इ. ठिकाणची वैद्यमंडळी आणि प्रेक्षक समूहाला साष्टांग नमस्कार घालून त्यांचे आशीर्वाद घेतले. सकाळीं ८ वाजण्याच्या सुमारास हा धार्मिकविधी

संपल्यानंतर कुटीच्या मोठ्या बाह्य परिसरांत मुंबईराज्याचे उपआरोग्यमंत्री श्री भाऊसाहेब वर्तक यांच्या अध्यक्षतेखालीं एक छोटासा समारंभ झाला. आयुर्वेदभवनचे अध्यक्ष आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री जोशी यांनीं सर्व उपस्थितांचें स्वागतपर भाषण करून ह्या रसायनकल्पाचें इत्थंभूत घटनात्मकवृत्त व त्याचें महत्त्व निवेदन केलें, वै. ना. ह. जोशी यांनीं संदेशवाचन केलें, वैद्य श्री अंतरकर यांनीं श्री वेलणकरांवर केलेल्या सर्व प्रारंभिक उपचारांच्या पंचकर्माचा शुद्धिकार्यासह अहवाल निवेदन केल्यावर महंत मुक्तानंद स्वामी, आयुर्वेदरत्न पंडित शिवशर्माजी यांचीं शुभ चिंतनपर भाषणें झालीं. शेवटीं अध्यक्ष श्री भाऊसाहेब वर्तक यांनीं आपल्या भाषणांत आयुर्वेद भवन संस्थेनें हातीं घेतलेलें हें कार्य अतिमहत्त्वपूर्ण आहे. आयुर्वेदशास्त्राचे संशोधन, प्रचार व प्रसार व्हावा म्हणून सरकारचे ही प्रयत्न होत आहेत, सरकारी रुग्णालयातून आयुर्वेदीय पद्धतीनें उपचार करण्यासाठीं मुद्दाम कांहीं शय्यांची सोय करण्यांत येणार आहे असें सांगून या कार्यास यश चिंतन केलें. शेवटीं आयुर्वेदभवनाच्या सदस्य वैद्य लक्ष्मीबाई बोरवणकर यांनीं उपस्थितांचे उचित शब्दांत आभार मानल्यावर हा समारंभ संपला. ह्या दिवशीं श्री वेलणकर यांना रसायन न देतां केवळ दुग्धाहार दिला गेला. कारण हा सर्व विधी ७ वाजण्याच्या पूर्वी होणें शक्य नव्हतें. रसायन सेवन ७ वा. करावयाचें असल्यानें तें २।२।६६ पासून नियमित सुरू झालें—

## कुटीप्रविष्ट श्री वेलणकर.

कुटीप्रवेशानंतर श्री वेलणकरांच्या रसायन सेवनकालांत व्यवस्था करण्यांत आली, तीही येथें निवेदन करणें इष्ट आहे. पुढें मागें ह्या माहितीचा उपयोग होईल.

१—अहोरात्र श्री वेलणकरांच्या सेवेसाठीं बाहेरच्या परिसरांत शुश्रूषकांची योजना करण्यांत आली.

२—शुश्रूषकाजवळ आमलकरसायनाचे आवळे थर्मासमध्यें ठेवलेले, तूप, मध, यांच्या बरण्या, आणि रसायन सेवनानंतर लागेल तेव्हां देण्याकरितां दूध, शिवाय वेळप्रसंगीं लागलीच तर हाताशीं असावीं म्हणून प्रथमोपचाराचीं साधनें व उपकरणें आणि आत्ययिक व्याधींवरील उपयुक्त औषधें ठेवलीं.

३—शिवाय वेळोवेळीं प्रकृती पाहाण्यासाठीं येणाऱ्या वैद्याला लागणारीं उपकरणें देऊन ठेवलीं गेलीं.

४ स्वयंसेवक आंतून दोरी ओढून वेलणकरांनीं घंटी वाजवून सूचना देतांच मधल्या परिसरांत जाऊन त्यांना काय हवें नको तें विचारून ते सांगतील ती योजना अर्थात वैद्यांना बोलावणें वा निरोप कळवणें, शौच मुखमार्जन व हातपाय धुणें यासाठीं गरम पाण्याची बादली मोरीवर नेऊन ठेवणें, वैद्यांनीं मल, मूत्र परीक्षण करावयाचें असतें तें त्या त्या भांड्यांत सांठवून ठेवणें. त्यांचे कपडे धुण्यासाठीं निवतील ते घेऊन धुण्यास देणें, हीं कामें त्यानें करावयाचीं.

प्रकृतिपरीक्षण योजना—सकाळीं ७ वाजतां रसायन सेवनकाळीं दुपारीं २ वाजतां, तिसरे प्रहरीं ५ वाजतां आणि रात्रीं ८ ते ८॥ वाजतां श्री वेलणकर यांचें प्रकृतिपरीक्षण वैद्यानें करावयाची योजना करण्यांत आली. यासाठीं प्रत्येक सप्ताहाला १।१ तज्ज्ञ प्रमुख वैद्यानें येथें राहावें असें ठरविण्यांत आलें. व स्थायी वैद्य म्हणून एक वैद्य नित्य ह्या कुटीच्या बाह्य परिसरांतच असावेत अशी योजना केली गेली.

ह्या योजनेनुसार पहिला सप्ताह आयुर्वेदभवन संस्थेचे अध्यक्ष व ह्या कल्पाचे अध्वर्यु आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री जोशी हेच राहिले. त्यांच्या वैयक्तिक साह्यार्थ भावी वैद्य अरविंद जोशी, सायनच्या आयुर्वेदविद्यालयाचे विद्यार्थी हेही राहिले.

ह्या नंतर वैद्य अनंताचार्य घळसाशी, वैद्यश्री चंद्रशेखर शास्त्री जोशी पुणें, मुंबईचे वृद्धवैद्य श्री मावळणकरशास्त्री, आयुर्वेद भवनचे कार्यकर्ते वैद्य श्री धों. स. अंतरकर, तसेच वैद्य श्री ना. ह. जोशी, भुसावळचे वैद्य श्रीकर दत्तात्रेय जळूकर यांनीं आपापल्या सवडीप्रमाणें येथें येऊन हें कार्य केलें. या शिवाय वारंवार आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री आणि वै. ना. ह. जोशी हे येऊन सर्व व्यवस्था पाहून व श्री वेलणकरांची प्रकृति तपासून त्यांना व उपस्थित चिकित्सकांना योग्य तो सल्ला देत असतच.

**प्रबंध**—१ कुटीच्या आसपास १०० फुटांच्या क्षेत्रांत कुणासही येण्याची सवलत ठेवली नाहीं, किंबहुना प्रतिबंधच केला गेला. पुरुषवर्गास फार तर कुटी पाहाण्यासाठीं कुटीच्या जवळ जाऊं देण्यांत येई, पण त्या परिसरांत बोलण्याची मनाई केली गेली.

२—स्त्रियांना तर संपूर्णतया प्रवेश प्रतिबंध पाळतां यावा म्हणून तशा सूचनेचे फलकच त्या क्षेत्राबाहेर लावून ठेवले गेले.

३—श्री वेलणकरांनीं थंड पाण्याचा स्पर्श हातापायांनाही

होऊं द्यावयाचा नाहीं. पाणी प्यावयाचें तर नाहींच. तहान भूक वाटेल तेव्हां दूधच घ्यावयाचें.

४ बाहेरच्या परिसरांतही समई, दिवा, मेणबत्ती अथवा मंद प्रकाशाची विजेरी ( बॅटरी ) यांचाच उपयोग तेथील व्यक्तींनीं करावयाचा.

५ स्थायी वैद्य म्हणून वैद्यश्री भालचंद्र रामचंद्र जडये आयुर्वेदप्रवीण यांची योजना केली गेली. त्यांनीं श्री वेलणकरांच्या कडून स्वतः विषयीं कांहीं निरोप प्रकृतीच्या दृष्टीनें प्रधानचिकित्सकाला कळवायचे, प्रधान चिकित्सक प्रकृति पाहाण्यास येतील तेव्हां उपस्थित राहून मिळतील त्या सूचनांचा योग्यवेळीं योग्यप्रकारें अवलंब करावयाचा असा संकेत ठरविला गेला.

पोटभर आवळे मध आणि तूप सकाळीं ७ वाजतां खाणें एवढाच कार्यक्रम श्री वेलणकरांचा असून भूक वाटेल तरच आणि तेव्हांच गाईचें दूध लागेल तसें तसें घ्यावें हा संकेत त्यांना कळविण्यांत आला. पहिले २।३ दिवस पोटभर म्हणजे किती ? हें माप निश्चित झालें नाहीं १२।१५ आवळे त्यांनीं खाल्ले पण त्याचा परिणाम त्यांना शौचाला अधिक जावें लागलें व द्रवमलप्रवृत्ति झाली. तेव्हां मग तें प्रमाण ५–६ आवळ्यावर आणून हळूहळू वाढवण्याची सूचना दिली गेली. त्यामुळें सर्व स्थिर झालें. पुढें मग वाढतां वाढतां २७ आवळ्यांपर्यंत प्रमाण वाढलें. व दूधही २ लिटरपर्यंत हळूहळू वाढलें. वर सांगितल्याप्रमाणें ३।४ तोळे वजनाचा प्रत्येक आवळ्याचा तो बलक असे. या दृष्टीनें जवळ जवळ पाऊण ते १ शेरपर्यंत हें आमलक रसायन सेवन होत गेलें. असा एक महिना झाला.

ह्या महिन्यांतच नव्हे तर पहिल्याच आठवड्यांत "मला आयुष्यभरांत वाटला नाहीं इतका उत्साह वाटूं लागल्याचें" अत्यानंदानें स्वतः श्रीवेलणकरच आचार्यांजवळ बोलले.

'मला ४ महिने राहूनही कंटाळा येणार नाहीं.' 'आनंदानें राहीन,' 'फार बरें वाटतें' असेंही मधून मधून तें म्हणूं लागले.

दोन सप्ताहानंतर श्री वेलणकरांचें आरंभीं पिवळे असलेले दांत मोत्यासारखे स्वच्छ झाले व बळकटही झाले.

त्वचा अगदीं सुंदर लुसलुशीत मऊ होऊन अगदीं बालकाचा कोमल स्पर्श वाटावा अशी झाली.

चवथ्या सप्ताहाच्या शेवटीं कानशिलावरचे केस पूर्वी पांढरे होते तेथें काळे आहेत असें दिसून आलें.

अवास्तव मेद झडल्यामुळें पूर्वीपेक्षां वजन कमी झालें, तरीपण उत्साह वाढला. लघ्वीचें परीक्षण करतांना रंग बराच लाल आहेसें आढळलें म्हणून आधुनिक परीक्षणासाठीं ती पाठवण्यांत आली. नुसती ती पाहातांच लघ्वीतून रक्त व विशिष्ट द्रव्य जात असलें पाहिजे असा तज्ज्ञांचा अभिप्राय व्यक्त झाला, पण प्रत्यक्ष परीक्षणांत तसें कांहींच आढळलें नाहीं म्हणून अधिक खात्रीसाठीं वरिष्ठ तज्ज्ञाकडे ती परीक्षणासाठीं पाठवली. परीक्षणानंतर त्यांचाही स्पष्ट अभिप्राय 'दोष कांहींच नाहीं' असा आला. इतकेंच नव्हे तर आतांपर्यंत सुमारें १ लक्ष तरी नमुने लघ्वीचे मी तपासले असतील पण असा नमुना पाहावयास मिळाला नाहीं असें ह्या तज्ज्ञांनीं आश्चर्य व्यक्त केलें. तेव्हां 'मूत्र विरजनीय' म्हणजे मूत्राला रंग येणें हें कार्य ह्या टिकाणीं रसायनानें घडलें असें सिद्ध झालें.

## परिसमाप्ति.

रसायन सेवनाचा शास्त्रोक्त एक महिन्याचा अवधि संपत आल्यानंतर श्री वेलणकरांना अधिक कार्श्य म्हणजे कृशता निर्माणहोण्याची शक्यता वाटूं लागली म्हणून आतां रसायन सेवन विधि संपवणें इष्ट आहे असें सर्वानुमतें ठरलें. तथापि रसायनसेवनही एकदम न सोडतां वाढवलें त्याच क्रमानें आवळे कमी खावे व दूध वाढवावे असा संकेत करून त्या प्रमाणें ४१ व्या दिवशीं आमलकरसायन सेवन संपूर्ण संपवून केवळ दुग्धाहार चालू केला.

४१ ते ५१ व्या दिवसापर्यंत दुग्धाहार ठेवून पुढें पेया यूषादि क्रमानें अन्नव्यवहार सुरू करण्याचें ठरलें.

**विशेष गोष्ट**–इतके दिवस केवळ दुग्धाहार असतांना जें घडलें नाहीं तें अन्न सुरू होतांच प्रत्ययास आलें तें म्हणजे अन्न सेवनाच्या रात्रीं श्री वेलणकरांना एक दिवस न कळत स्वप्नदोष झाल्याचें त्यांनीं सांगितलें. यावरून अन्न म्हणजे धान्याचें बीज शरीरांत पोंचतांच त्यानें प्रजोत्पादन क्षम समान-धर्मी बीज शुक्रांत निर्माण केलें केवळ दूध हें सद्यः शुक्रकर असलें तरी त्या शुक्राचें शुक्रकला संवर्धनाच्या दृष्टीनें पर्यवसान होऊन पुष्टि वाढते. आलेला हा एक प्रत्यक्ष अनुभव नमूद करून ठेवण्याजोगा वाटला.

## अंतःपरिसरांतील शेवटचा दशाह.

४० व्या दिवशीं म्हणजे १३ मार्च १९६६ ला श्री वेलणकरांवर चालू असलेल्या रसायन कल्पांतील आवळ्यांच्या सेवनाचा कार्यक्रम संपला. अर्थातच ते सेवन करतांना जसे क्रमानें वाढवले तसेच १ महिन्यानंतर क्रमशः कमी केले गेले. कारण तसें केलें नसतें

तर एकदम सोडल्यानें दुष्परिणाम होण्याची शक्यता होती. अभ्यासिलेली कोणतीही गोष्ट मग तें एखादें व्यसन असो वा चांगली गोष्ट असो ( उ० व्यायाम किंवा संवयीचें अन्न ) एकदम न सोडतां क्रमशः सोडावें अशी जी शास्त्राज्ञा आहे ती याच दृष्टीनें होय ! असो.

४१ व्या दिवशीं श्री वेलणकरांना आवळे देण्याच्या नित्याच्या सकाळच्या वेळीं दूध दिलें गेलें. नंतर कांहीं वेळानें त्यांचें क्षौरकर्म करविण्यांत आलें व सर्व आंगाला चंदन, वाळा आणि काळे तीळ दुधांत वाटून तें उटणें लावलें व वाळल्यावर स्वच्छ कपड्यानें पुसून काढलें.

दहा दिवस म्हणजेच ५० व्या दिवसापर्यंत श्री वेलणकरांना ह्याच परिसरांत राहूं दिलें. उटण्याचा कार्यक्रम रोज चालू ठेवला गेला व तें चोळून लावतांना त्वचेला सहन होईल ह्या बेतानें त्याचा जोर वाढवला. इतर सर्वही कार्यक्रम पूर्ववत् चालूच राहिले. स्नानही वर्ज्यच राहिलें. गाईच्या दुधाचा आहारही चालूच राहिला.

## दुसऱ्या परिसरांत प्रवेश

५१ व्या दिवशीं श्री वेलणकरांना बलातैलानें अभ्यंग करविण्यांत आलें. आणि सातूच्या पिठाचें उटणें कोमट दुधांत लावून असाणा झाडाच्या सालीचा काढा गाळून शिकेकाईप्रमाणें आंगाला लावला आणि जवळच असलेल्या विहिरीचें पाणी वाळा घालून उकळलें व त्यांत दुसरें थंड पाणी न घालतां सोसवेल इतपत आपोआप निवाल्यावर त्या पाण्यानें स्नान घातलें. नंतर सर्वांग पुसून कोरडें केल्यावर चंदनाचा लेप लावला. आणि नंतर निवासाकरतां दुसऱ्या परिसरांत आणलें. १० दिवस हा कार्यक्रम चालू होता.

आहार--५१ व्या दिवशीं दुग्धाहार कमी करून धान्याहार सुरू करण्यांत आला. अर्थातच वर म्हटल्याप्रमाणें तोही क्रमशःच कमी करणें इष्ट असल्यानें मुगाचें कढण आणि सातूची पेज ह्यांची योजना करण्यांत आली. ह्या दहा दिवसांत अन्नकालाच्या वेळीं म्हणजे फक्त दुपारींच ह्यांपैकीं आलटून पालटून हा पातळ धान्याहार दिला गेला. ६० व्या दिवसापर्यंत ह्याप्रमाणें दुसऱ्या परिसरांत ते राहिले.

## तिसऱ्या परिसरांत

६१ व्या दिवशीं गेल्या १० दिवसाप्रमाणें अभ्यंग करणें व स्नान हे कार्यक्रम आटोपून श्री वेलणकरांची तिसऱ्या परिसरांत आगेकूच झाली. ह्या ठिकाणीं आहारांत क्रमशः बरेंच परिवर्तन झालें. त्यांचा जठराग्नीही आतां प्रदीप्त असल्यानें अन्नाहाराचें स्वरूप प्रमाण आणि वेळा वाढवणें इष्ट होतेंच. तथापि अन्न पचून तें आंगीं लागावें आणि तुष्टि, पुष्टि वाढण्यास त्याची मदत व्हावी हा उद्देश दृष्टीआड करणें शक्य नव्हतें. म्हणून जव आणि मूग ह्या २ धान्यांची पातळ पेज अथवा कढण, नंतर आटवल, लापशी अशा क्रमानें द्रव आहाराकडून घन आहाराकडे वळणें इष्ट होतें. ६१ ते ६४ व्या दिवसापर्यंत पेज व कढण दुपारीं १२ वाजतां आणि रात्रीं अशा दोन्ही अन्नकालीं दिलें. आणि ६५ व्या दिवशीं जवांचाच मऊ सैलसर भात व मुगाची सरबरीत उसळ असा आहार दिला. अन्नाच्या ह्या दोन्ही प्रकारांसाठीं यापुढें अधिक रुचि आणि तें सुपाच्यही व्हावें म्हणून सैंधव, आलें, जिरें, आमसूल, गूळ आणि तूप ह्या द्रव्यांचा फोडणी देणें, मिश्रण करणें इ. संस्कारपूर्वक उपयोग सुरू केला गेला. याच क्रमानें पुढील कांहीं दिवसांत श्री वेलणकर हे नित्याचा आहार घेऊं लागतील. या शिवाय हवें तेव्हां दूधही देण्यात येतें व तें पुढेंही देण्यांत येईलच.

६१ ते ७१ हा दहा दिवसांचा काळ जरी ह्या शेवटच्या म्हणजे तिसऱ्या परिसरांत घालवावा असें असलें तरी श्री वेलणकर यांनीं आपल्या इच्छेनुसार ह्या कुटीच्या तीनही परिसरांत जा ये करण्यास प्रतिबंध ठेवला गेला नाहीं.

ज्या रसायन–कल्पाच्या सेवनासाठीं श्री वेलणकरांना मुंबईपासून ५० मैल दूर अंतरावरील ह्या पुण्यभूमीच्या आणि स्वामी श्री मुक्तानंदांच्या छायाछत्राखालीं कुटीमध्यें प्रविष्ट करून ७० दिवस राहावें लागलें तो सर्वही काळ प्रभु अश्विनीकुमारांच्या कृपेनें आणि महंतजींच्या आशीर्वादानें निर्विघ्न पार पडून आयुर्वेदभवनाच्या सर्वही सदस्यांना परिश्रमाचें आणि साहसाचें बरेंचसें चीज झाल्याचें समाधानही लाभलें. जनताजनार्दनाच्याही सदिच्छा पाठीशीं आहेतच. ह्या रसायनकल्पापूर्वीचे श्री वेलणकर आणि नंतरचे वेलणकर ह्या दोन चित्रांतील फरक ज्यांना प्रत्यक्ष पाहातां आला नाहीं त्यांच्यासाठीं आणि स्वयंस्फूर्तीनें हा विधि आपणही करवून घ्यावा म्हणून कुणी प्रेरित झाले व आपल्या हातून हा रसायनकल्पाचा कुटीप्रावेशिक विधि करावा असें तज्ज्ञ वैद्य बंधूंना वाटलें तर त्यांना ह्या विषयाचें मार्गदर्शन व्हावें ह्या हेतुनेंच हें इतिवृत्त प्रसिद्ध होत आहे.

आतां कर्मफलाची सांगता ह्या दृष्टीनें ह्या रसायनकल्प विधीनें श्री वेलणकरांत काय स्थित्यंतर झालें याचें

छोटेसें शब्द चित्र वाचकापुढें मांडल्या वांचून हें इतिवृत्त पुरें होणार नाहीं. म्हणून तें देतों.

## श्रीवेलणकर पूर्वीचें व आतांचे

ह्या रसायन कल्पाच्या सिद्धीसाठीं अगदीं आरंभापासून प्रति सप्ताह १ प्रधान चिकित्सक आणि एक स्थायी सहाय्य चिकित्सक अशा दोन वैद्यांची योजना केली गेली होती हें पूर्वी सांगितलें आहेच. त्या प्रत्येक आठवड्यांत नियुक्त चिकित्सकानें श्री वेलणकरांची सर्वांगीण प्रकृति रोज दिवसांतून ४ वेळां पाहिली आणि त्या प्रत्येक वेळीं आढळलेल्या शारीर व मानस परिस्थितीची अगदीं बारीक सारीक लक्षणांच्यासह नोंद ठेवलेली असल्यानें ह्या रसायन कल्पाच्या सेवनानें श्री वेलणकरांच्या प्रकृतींत कसकसें परिवर्तन आणि सुधारणा होत गेली, याचा अगदीं नकाशाच दृष्टीपुढें उभा राहातो. तथापि ह्या ७० दिवसांचा इतका विस्तृत तपशील देणें इष्ट व शक्यही नाहीं. म्हणून ७० दिवसांनंतरच्या स्थितीचें श्री वेलणकरांचें शब्दचित्रच वाचकांपुढें ठेवणें श्रेयस्कर वाटतें. पूर्वी असलेली अमुक विकृति दूर झाली आणि पूर्वी नव्हती ती चांगली गोष्ट नव्यानें निर्माण झाली अशी स्पष्ट कल्पना पुढील शब्दचित्रावरून वाचकांना येईल असा दृढ भरवसा आहे.

क्रमशः नाडी, मूत्र, मल, जिव्हा, दृष्टि, त्वचा, स्नायु, केस, नखें, दांत, झोप आणि मनःप्रवृत्ति यांचें दिग्दर्शन केलें जात आहे.

१ **नाडी** – पूर्वी सकाळीं ७२ ते ८० पर्यंत असणारी नाडी वातकाळीं प्रति मि. १०० पर्यंत स्पंदनगतीची होत असे, ती आतां नेहमीं ७०।७२ असते.

२ **मूत्र** – पूर्वीच्या मूत्राला विशिष्ट दुर्गंध असे व व गढूळपणा असे तो जाऊन तें मंजिष्ठाच्या काढ्याच्या रंगाचें अथवा दूध रहित चहाच्या पाण्याच्या रंगाचें आतां आहे, गाळ व गढूळपणा गेला दुर्गंधही गेला. आयुर्वेदशास्त्रदृष्ट्या मूत्रविरजनीय कार्य येथें घडलें.

३ **मल** – अगदीं प्राकृत स्वरूपांत असतो, दुर्गंधही नाहीं, फक्त पित्त काळीं म्हणजे दुपारीं झाल्यास किंचित् द्रव मलप्रवृत्ति होते.

४ **जिव्हा** – पूर्वी जीभ नेहमीं चिकट व पांढरी असायची ती आतां फक्त सकाळीं किंचित् पांढरी असते. इतर वेळीं स्वच्छ व तांबडी असून पातळ आहे.

५ **दृष्टि** – नेत्रांत नाविन्यपूर्ण चमक वाटते.

६ **त्वचा** – त्वचेवरील सुरकुत्या गेल्या, डागही बरेचसे गेले. व त्वचा मऊ झाली.

७ **स्नायु** – प्रत्येक स्नायूला त्या त्या स्थानानुसार व गोल असा नैसर्गिक आकार प्राप्त होऊन स्पष्ट व ठसठशीत झालेला दिसतो.

८ **केस** – डोक्याचे केस चांगलेच मऊ व पुष्कळसे काळे झाले. दाढीचे गालाच्या भागावरील केसांनाही मऊपणा आहे. परंतु गळ्याच्या खालचे मात्र पांढरेच राहिले आहेत.

९ **नखें** – हातांच्या व पायांच्याही नखांना मृदुत्व, लाली व तेजस्विता आली आहे.

१० **दांत** – दांतांचा पूर्वीचा पिवळा रंग जाऊन ते अत्यंत स्वच्छ आणि पाणीदार मोत्यांसारखे तेजस्वी झाले.

११ **झोंप** – पूर्वीपेक्षां झोंपेचें प्रमाण वाढलें नसलें तरी येणारी ४ तासांची झोंप पुरेशी वाटून ह्या कमी झोपेनें उत्साह कमी झाला नाहीं.

१२ **मनःप्रवृत्ति** – मूळचे सात्त्विक भाव अधिक वाढले, बऱ्या वाईटाबद्दल विधिनिषेधाचे परिणाम होत नाहींत व झोंप गाढ लागून देवादिकांचीं व जलाशयांचीं स्वप्नें पडतात.

## –यापुढें–

गणेशपुरींतील कुटीचा हा वास्तव्य काल संपवून महंत श्री मुक्तानंद महाराजांचे आशीर्वाद घेऊन श्री वेलणकरांना पुनश्च आयुर्वेद भवनमध्यें राहावयाचें आहे. सामान्यतः तीन महिने नियुक्त वैद्यांशिवाय कुणाशीही न बोलतां ह्या मौनकालांत आपले आध्यात्मिक दृष्ट्या जपजाप्यादि अनुष्ठान ते करतील. मौन संपल्यावरही तीन महिने ते राहातील. व ह्या ६ महिन्यांच्या काळांत त्यांना आयुर्वेदीय शास्त्रपद्धतीनें प्रकृति-स्थापन चिकित्सा आणि तुष्टि–पुष्टिद कल्प यांची योजना केली जाईल.

संपूर्ण वर्ष ह्याप्रमाणें व्यतीत झालें म्हणजे श्री वेलणकर आपल्या अंतःप्रेरणेनुसार जीविकेसाठीं व्यवसाय जपानुष्ठान इ० करण्यास पूर्ण स्वतंत्र राहातील. तथापि प्रतिवर्षी एक महिना मार्गशीर्ष, पौष अथवा माघ यांपैकीं केव्हांही हा परिणाम अखंड टिकून राहण्यासाठीं उपचार घ्यावेत त्यासाठीं अर्थातच पुढें कुटी प्रवेशादिखटाटोपाची आवश्यकता नाहीं. अशी आवश्यकता असल्याचें त्यांना सुचविण्यांत येईल. निष्ठा आणि निश्चयवान श्री वेलणकर याप्रमाणें पुढेंही करतील आणि आपलें ऐहिक व पारलौकिक अभीष्ट साधल्याचें समाधान प्राप्त करून घेतील असा विश्वास आहे.

# आभार

आरंभिलेलें कोणतेंही कार्य निर्विघ्नपणें शेवटास गेलें म्हणजे कार्यकर्त्यांना आपल्या शिरावरचा भार उतरल्याचें समाधान वाटतें; व मग आपणास फार मोठें वाटणारें हें कार्य सहज सुलभतेनें पार पडल्याच्या समाधानाबरोबर आश्चर्य वाटूं लागतें. तेव्हां कार्य चालू असतां ज्यांच्याकडे लक्ष देण्यासही सवड झाली नाहीं त्या सर्व उत्सवमूर्ति डोळ्यांपुढें उभ्या राहातात. आणि मग वाटतें कीं 'अनंतहस्तें कमलावरानें देतां किती घेशिल दो करानें ?' हें सुभाषित अक्षरशः खरें आहे. गणेशपुरीच्या पुण्यभूमींत श्री मुक्तानंद स्वामिजींच्या कृपाछत्राखालीं गेले जवळ जवळ २॥ महिने चालू असलेला हा आयुर्वेद कल्परूपी यज्ञ आज परिसमाप्त होऊन त्या यज्ञाच्या परिसमाप्तीच्या अवभृथस्नानासाठीं आपण सर्व येथें जमलों आहोंत. यावेळीं ज्यांनीं ज्यांनीं ह्या यज्ञकार्यांत भाग घेतला त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें ही गोष्ट संचालक मंडळाच्या दृष्टीनें यज्ञाच्या पूर्णाहुतीसारखी आहे म्हणून तें गोड निवेदन करूंया.

१ श्री द. रा. वेलणकर ह्या सर्व यज्ञकार्यांत आमचे इष्ट होत. कुटीप्रावेशिकरसायनकल्पविधान आयुर्वेदीय पद्धतीनें सिद्धीस नेण्यासाठीं श्री वेलणकर यांनीं आपली आंतरिक तळमळ व्यक्त केली इतकेंच नव्हे तर आयुर्वेद-भवनच्या संचालक मंडळानें त्यांना ज्या ज्या शास्त्रीय कसोटीस लावण्याचे प्रयत्न केले त्या सर्वांना त्यांनीं अत्यानंदानें सहन केलें. इतकेंच नव्हे याहीपेक्षां अधिक खडतर निर्बंध असावयास पाहिजे होते आणि अधिक दीर्घ काळ हें व्रत पाळण्याची संधि मिळावयास पाहिजे होती. हे त्यांचे आजचे विचार समजल्यावर ते खरे योगीजनांच्या कोटींतील गृहस्थ आहेत असें म्हणावेंसे वाटतें (पण गृहस्थ म्हणणें ही चूकच आहे, कारण श्री वेलणकर हे ब्रह्मचारी आहेत) कांहींही असलें तरी ह्या महत्तम प्रयोगाच्या कार्यास हातीं घेऊन तें सिद्धीस नेण्याचें सर्वस्वी श्रेय श्री वेलणकर यांना आहे. म्हणून आयुर्वेदभवनतर्फे त्यांचे प्रथम आभार मानतों. श्रीवेलणकर यांच्या ह्या उपकृतीनें त्यांनीं आम्हालाच नव्हे अखिल भारताला किंबहुना अखिल वैद्यकीय जगाला जोराचा धक्का देऊन जागें केलें म्हणून संपूर्ण वैद्यकीय जग त्यांचें ऋणी आहे.

२ "सामर्थ्य आहे चळवळीचें...परंतु तेथें भगवंताचें अधिष्ठान पाहिजे" समर्थ श्रीरामदासस्वामींनीं म्हटल्या-प्रमाणें आयुर्वेदभवनाच्या ह्या मंगलकार्याला श्रीमुक्तानंद स्वामीजींचें आशीर्वाद आणि गणेशपुरी-सारखें भगवंतांचें अधिष्ठान लाभलें नसतें तर हा यज्ञ सिद्धीस जाणें अशक्यच होतें. महाराजांनीं आरंभापासून शेवट पर्यंत अगदीं बारीक सारीक गोष्टींत जातीनें लक्ष घालून आमचा फार मोठा कार्य-भार हलका केला. त्यांच्या उपकारांचें ओझें आभारांच्या शब्दांनींच कायमचं कशानेंच फिटणें शक्य नाहीं म्हणून तें गोड ओझें तसेंच शिरीं धारण करून नम्रभावानें कृतज्ञता व्यक्त करतों.

३ कुटीप्रावेशिक विधीला प्रथम कुटी पाहिजे होती ती नसती तर प्रवेश कुणाचाच कुठेंच झाला नसता. तेव्हां हें महत्वाचें कार्य ज्यांनीं मनावर घेतलें व शास्त्रोक्त पद्धतीनें ही कुटी बांधून दिली त्या उदारधी गुरुदेव आश्रमाच्या विश्वस्तांचे आभार मानण्यास शब्दच अपुरे पडणार आहेत. त्यांच्या ह्या सत्प्रवृत्तीला धन्यवाद !

४ कार्य निश्चित झाल्यानंतर साहित्य नुसतें आणून भागत नाहीं त्याला कुटणें, दळणें, निवडणें, शिजविणें इ० किती तरी गोष्टी कराव्या लागतात. त्या सर्व स्वयंसेवकांचे श्रम योग्य झाले तरच सर्व कार्य यथासांग पार पडतें; पण नियमच असा असतो कीं त्यांच्या श्रमाकडे कुणाचेंच लक्ष जात नाहीं. उणीव भासली तर मात्र नेमका डोळा त्यांच्याकडे पाहून मोठा होत असतो. पण ह्या पवित्र कार्यांत श्री महा-राजांच्या प्रेरणेनें, विश्वस्तांच्या अनुज्ञेनें आणि पवित्र अभूतपूर्व कार्य आपल्या हातून होते या बुद्धीनें कुटी बांधणें, पळसाचे वृक्ष तोडणें आवळ्यांची भट्टी लावणें, श्री वेलणकरांना हवें तें वेळेवर सर्व देणें, गाईची वासरांची देखरेख, धार काढणें, दुभत्याची सर्व

व्यवस्था करणे इ. इ. अनेक गोष्टी ह्या स्वयंसेवकांच्याच बळावर पार पडल्या. त्या सर्वांचीं नांवें अनंत आहेत तीं कोठवर वर्णावीं ? अशा त्या अनंत स्वयंसेवकांना शतशः हार्दिक धन्यवाद.

५ ह्या यज्ञकार्यात ज्या ज्या वैद्य बंधूंनी स्वयंस्फूर्तीने व त्यागबुद्धीनें १।१ आठवडा अथवा याहून कमी अधिक दिवस येथें राहून श्री वेलणकरांच्या दिनचर्यादि विधीवर आणि रसायनाच्या परिणामावर लक्ष ठेवून त्याची नोंद ठेवून बहुमोल कार्य केलें आहे. त्या वैद्यश्री श्रीपादशास्त्री मावळणकर, वै. अनंताचार्य घळसाशी, वै. चंद्रशेखर गणेशशास्त्री जोशी, वै. घों. स. अंतरकर, वै. श्रीकर द. जळूकर, वै. भालचंद्र जड्ये ह्या सर्वाविषयीं : आयुर्वेदभवनसंस्थेच्यावतीनें कृतज्ञता व्यक्त करतों.

६ 'न घरी शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' हें भगवान श्रीकृष्णानें भारतीय युद्धाच्या वेळीं सांगितलें होतें तसे आमच्या ह्या महत्त्वपूर्ण कार्यांत वेळोवेळीं युक्तीच्या ४ गोष्टी सांगणारे वै. नृसिंहाचार्य बागेवाडीकर शास्त्री. डॉ. पी. एम्. मेहता. वैद्यरत्न पं. शिवशर्मा, डॉ. व्ही. बी. आठवले, डॉ. धीरुभाई दोशी. डॉ. आर. सी. मेहता आदिमंडळींचासुद्धां धन्यवादपूर्वक उल्लेख करणे इष्ट आहे.

७ 'सर्वारंभास्तंडुलप्रस्थमूलाः' हें ओळखून आयुर्वेद-भवनच्या ह्या सत्कार्यामध्यें आपलाही भाग असावा ह्या अपेक्षेनें स्वयंस्फूर्तीनें ह्या कार्यासाठीं ज्यांनीं आर्थिक साह्य केलें, पाठवलें, आश्वासन दिलें त्या वैद्य श्रीमंत नानासाहेब पुराणिक, श्री धूतपापेश्वर पनवेल, श्री गोपाळदास पारेख, झंडू फार्मसी, रावसाहेब सांडू ब्रदर्स, परशुरामपंत गणपुले, डॉ. देसाई पर्ल कंपनी, श्री मनुसुमेदार लोटसट्रस्ट, वै. माधव गणेश शेंडे दंत वैद्य, वै. वामनराव दीनानाथ बऱ्हाणपूर, वै. त्र्यं. म. गोगटे अमरावती, वैद्य त्रिवेदी आयुर्वेद उपचार-संघटना खामगाव, वै. श्रीकर द. जळूकर इ. चे मनःपूर्वक आभार.

८ कायाकल्प-सिद्धीसाठीं पळसाच्या वृक्षांची आवश्यकता पूर्ण केल्याबद्दल वनमंत्री श्री मधुकरराव चौधरी यांना धन्यवाद.

९ उपआरोग्यमंत्री ना. भाऊसाहेब वर्तक यांनीं अगदी प्रारंभापासून ह्या विधीकडे आत्मीयतेनें पाहून वेळोवेळीं जें वैचारिक व अन्य सर्वप्रकारचें साह्य केलें त्याबद्दलही आयुर्वेद भवन संस्था ह्यांची ऋणी आहे.

१० ह्या कायाकल्प विधीच्या निरनिराळ्या प्रसंगांचीं छायाचित्रें घेऊन ज्यांनीं आम्हास उपकृत केलें त्यांनाही धन्यवाद.

११ हें वृत्त अगदीं घाईनें पण उत्तम छापून दिल्यानें आम्हास फार मोठें साह्य केल्याबद्दल निर्णयसागर प्रेसच्या संचालकांचे आभार.

१२ या शिवाय 'ऐका हो ऐका' माजघरापासून राज-गृहापर्यंत नव्हे राजसिंहासनापर्यंतच्या सर्व गोष्टी जगाच्या चावडीवर मांडणारे वृत्त पत्रकार समाजावर जे उपकार करतात त्यांना मोलच नाहीं. आमच्याही ह्या पवित्र कार्याच्या बाबतींत ह्या पत्रकारांनीं वेळोवेळीं वज्रेश्वरीला स्वतः येऊन व चौकशी करून आणि आम्ही दिलेल्या वृत्ताला जी प्रसिद्धि दिली तिच्यामुळें ह्या रसायन कल्पविधीला इकडे व सातासमुद्रपलीकडेही जें महत्त्व आलें तें अवर्णनीय आहे. पत्रकारांच्या ह्या उपकृतीला धन्यवाद.

१३ महत्त्वाची गोष्ट ह्या समारंभाचें पुण्याहवाचन ज्यांच्या हातून झालें व ज्यांनीं ह्या विधींत आद्यंत आत्मीयतेनें लक्ष घातलें त्या श्री बाबासाहेब करंदीकरांचे आभार मानणेंही पवित्र कर्तव्य आहे.

१४ याशिवाय कुटीनिर्माते तज्ञ श्री सुरेश जगन्नाथ आठल्ये आयुर्वेदभवनचे लेखनिक श्री. द. गो. कवे आणि वेळोवेळीं भाषासौष्ठवयुक्त असें प्रसिद्धीकरणाचें सर्वही लेखन कार्य करणारे वैद्य दत्तात्रेयशास्त्री जळूकर यांचेही आभार मानणें क्रमप्राप्त आहे.

शेवटीं ज्या परम मंगल भगवंताच्या कृपेनें ह्या सर्व मंगलप्रसंग निर्विघ्नतेनें शेवटास गेला त्या सर्वशक्तिमान प्रभूचेही उपकार मानून हे आभाराचे शब्द पुरे करतों.

ॐ शांतिः शांतिः शांतिः